# ५७ ची

# सत्यकथा

सन अठराशें सत्तावनची
भारतीय वीरांच्या
रक्तानें रंगलेली
पहिली स्वातंत्र्य-युद्धकहाणी

लेखक : विठ्ठल वामन हडप




मूल्य दीड रुपया

इ. सन. १८५७ मधील पहिल्या स्वातंत्र्य युद्धाचें – भारतीय आंदोलनाचें हें सरळ, सोपें, सत्य व सोज्ज्वल असें कथारूप इतिहासकथन आहे.

ज्यांना मराठी चांगलें लिहितां वाचतां येतें अशा सर्वसाधारण प्रौढ साक्षर वर्गाला, त्याप्रमाणेंच वरच्या इयत्तांतील विद्यार्थी वर्गाला भाषा, इतिहास व सामान्यज्ञान ह्यांचा बहुशः शिक्षकांच्या अनिवार्य मदतीखेरीजही लाभ करून ेतां यावा, ह्या दृष्टीनें '१८५७' पुरती ही इतिहासकथा सांगण्यांत आली आहे.

ल्या स्वतंत्र भारतांतील उद्यांच्या कर्त्या पिढीला भारताच्या इतिहासांतील महत्त्वाच्या घटनांची सर्वतोपरी निर्मळ ओळख व्हावी, हा उद्देश मनांत रून लेखकानें ही इतिहासकथा लिहिली आहे. आणि हा प्रयत्न एकंदरींत पांचां मुखीं इष्ट ठरला, तर 'पानिपत', 'जालियनवालाबाग', 'चंपारण्य', 'बार्डोली', 'नऊ ऑगस्ट' अशा वेचक व व्यापक महत्त्वाच्या घटनांवर अशाच इतिहासकथा लिहिण्याचा मानस आहे.

कोणताही देश घेतला, तरी स्वातंत्र्य मिळविणें जेवढें अवघड असतें, त्यापेक्षां मिळविलेलें स्वातंत्र्य टिकविणें अधिक अवघड असतें. स्वतंत्र भारतापुढेंही हा प्रश्न आहेच. हा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी मावळत्या पिढ्यांपेक्षां उगवत्या पिढ्यांवर – वर्तमानकाळापेक्षांही भविष्यकाळावर अधिक आहे. ज्या उदात्त ध्येय-निष्ठेनें भारतानें स्वातंत्र्य संपादन केलें, त्या ध्येयनिष्ठेचा विशाल वटवृक्ष वाढला पाहिजे. त्या वटवृक्षाच्या छायेखालीं भारताचा विशाल भारत विकसित झाला पाहिजे. तो जगांतील मानवतेच्या प्रगतिपथावरील मार्गदर्शक प्रकाशमान नंदादीप शोभला पाहिजे. हीच प्रेरणा ह्या इतिहासकथांच्या मुळाशीं आहे.

ही इतिहासकथा लिहितांना मला अनेक इंग्रजी, मराठी व हिंदी ग्रंथांचा अमोल उपयोग झाला आहे. हें साहित्य आतां सर्वविश्रुत असल्यानें त्या ग्रंथांचा ांवनिशीवार उल्लेख करीत न बसतां मी मनमोकळेपणानें त्या सर्वांचें ऋण कबूल रतों. ह्यांत लेखकाचा स्वतःचा असा ऐतिहासिक दृष्टिकोन. तो पूर्ण वास्तववादी ाहे हें वाचकांना न सांगतांही कळून येण्याजोगें आहे.

विठ्ठल वामन हडप

शिक, ४ फेब्रुआरी, १९५५



## कथानुक्रम


१. राम–रहीम एक व्हा १
२. आंत पेटलेली आग ८
३. कांव्याचा नायटा १४
४. 'मेरी झांसी नही दूंगी!' २१
५. ही रामाची अयोध्या २७
६. सुरुंगाच्या वातीवर ठिणगी ३२
७. क्रांतियज्ञाची सिद्धता ३८
८. 'मंगल पांडे की जय!' ४४
९. मीरतचें हत्याकांड ५०
१०. दिल्लीवर स्वातंत्र्यध्वज फडकला ५५
११. शूर शीखांची पंजाबांत पिछेहाट ६०
१२. घडणार नव्हतें तें घडलें ६६
१३. ह्यांना म्हणतात रोहिले! ७१
१४. काशी-प्रयागाचें आंदोलन ७७
१५. कानपूर-झांशींत मराठी राजवट ८६
१६. अयोध्येंतील जय ९५
१७. दिल्लीचा पेंच ९९
१८. पेशव्यांचें कानपूर पडलें! १०३
१९. बिहारच्या सिंहाचा कोंडमारा १०८
२०. दिल्ली पडली! ११३
२१. लखनौ पडलें! ११८
२२. बिहारच्या सिंहाचा अंत १२३
२३. मौलवी अहंमदशाहाचा खून १२६
२४. राणी लक्ष्मीची आहुति १३०
२५. व्हिक्टोरिया राणीचा जाहिरनामा १४१
२६. अखेरची ज्योत मालवली! १४५
२७. १८५७ चा महाराष्ट्र १५०
२८. चला, इथून पुढें चला... १५५



प्रकरण पहिलें

# राम–रहीम एक व्हा



ब्रह्मावर्तातील श्रीमंत पेशव्यांच्या राजवाड्यांत त्या रात्रीं ते दोन तेजस्वी तरुण कांहीं मसलती करीत बसले होते. त्यांतला एक होता श्रीमंत नानासाहेब पेशवे आणि दुसरा त्यांचा विश्वासू जिवलग मित्र अजिमुल्लाखान.

शेवटच्या बाजीराव पेशव्यांना इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीसरकारनें मराठशाहीचें मोल म्हणून दिलेली सालिना आठ लाख रुपयांची नेमणूक बाजीराव पेशव्याच्या मृत्यूनंतर बंद केली होती. आपल्या पेशवाई गादीला वारस म्हणून मांडीवर घेतलेला पेशव्यांचा दत्तक पुत्र नानासाहेब पेशवा असा आपल्या वडिलार्जित पेशवाई हक्कांना मुकला होता.

कंपनीसरकारचा पेशव्यांवर हा उघड उघड जुलूम होता. पण तो जबरदस्ताचा जुलूम. त्याविरुद्ध दुबळ्यांनीं दाद कुठें आणि कशी मागावी ?

परंतु नानासाहेब पेशवा असा अगदींच दुबळा नव्हता. तो शरीरानें तर खंबीर होताच. तसाच मनानेंही सिंहाच्या छाव्यासारखा दमदार होता. तसाच बुद्धिमान्, तसाच चतुर, तसाच प्रेमळ आणि गोडही. पण प्रसंग पडला कीं तसाच पोलादी मनाचा. तो कंपनीसरकारच्या जुलुमापुढें मुकाटपणें मान नमवायला मुळींज राजी नव्हता. कंपनीसरकारचें राज्य कायद्यांवर चालतें, असा अजून त्याचा विश्वास होता. भारतांत आपणावर कंपनीसरकारनें अन्याय केला, तरी त्या सरकारचेंही सरकार – व्हिक्टोरिया राणीचें इंग्रज सरकार – विलायतेंत वर बसलें होतें. त्या सरकारपाशीं जाऊन आपल्यावरील अन्यायाची दाद लावून घ्यावी असें नानासाहेबानें योजिलें होतें. तींच खलबतें त्या दोन मित्रांत त्या रात्रीं चाललीं होतीं.

"पण सरकार ! विलायतेंत तरी आपल्या गाऱ्हाण्याची दाद लागेल का ? कीं तिथेंही इथल्यासारखींच आपल्या तोंडाला पानं पुसलीं जातील ?" बोलतां बोलतां अजिमुल्लाखानानें विचारलें.

"विलायतेंत दाद लागेल. येथला कंपनीसरकारचा जबरदस्तीचा कारभार विलायतसरकारला सदासर्वदा पसंत असतोच असें नाहीं. गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसी इकडे येऊन भस्मासुरासारखा हिंदी राजेरजवाड्यांच्या राजवैभवाचा फडशा करीत सुटला आहे, ह्याची दाद विलायतसरकारला लागेल तर ना ? आम्हीं आमचीं हीं गाऱ्हाणीं तिकडे जाऊन विलायतसरकारच्या वेशीवर टांगलीं नाहींत, तर तिकडे आमची दाद एरव्हीं कशी लागणार ?"

"पण असं पाहा सरकार ! कंपनीसरकार हें तरी विलायतसरकारचंच भारतांतील प्रतिनिधिसरकार नव्हे का ? डलहौसी ही विलायतसरकारच्या हातांतली कुऱ्हाड आहे. आपणाला आपणावर घाव घालणारी कुऱ्हाड तेवढी दिसते ; पण ती कुऱ्हाड मुठींत धरणारा हात दिसत नाहीं. तो हात

आपणाला न्याय देणार? तें कांहीं नाहीं. ह्यावर परवां आपण बोलतां बोलतां म्हणालां होतां तेवढा एकच उपाय."

"बंड?"

"होय. बंड. नुसतं बंड नव्हे."

"बंड म्हणजे स्वातंत्र्यासाठीं समरांगणावरची भाषा. तोंडानें बोलण्याची भाषा नव्हे ती; तरवारीनें शत्रूचीं कंठनाळें चिरीत बोलण्याची भाषा."

"होय. ती भाषा. आपल्या शत्रूला साध्या भाषेंतलीं आमचीं गाऱ्हाणीं ऐकूं जाणार नाहींत. तरवारीच्या भाषेंत आपण बोलूं लागूं तेव्हांच कंपनी-सरकारचे कान उघडतील."

"तशी वेळ येणार असं मलाही वाटतं. पण त्यापूर्वी एकदा हा प्रयत्न करून पाहावा."

"सातारच्या छत्रपति प्रतापसिंहमहाराजांनीं मारे खूप प्रयत्न करून पाहिला. रंगो बापूजीसारखा हुषार वकील विलायतेंत आपलं गाऱ्हाणं सांगण्यासाठीं पाठविला. तोही तिकडून हात हलवीत कां माघारा यावा? जिथें छत्रपतींच्या गाऱ्हाण्याचीही दाद लागत नाहीं, तिथें छत्रपतींच्या पेशव्यांची काय दाद लागणार हें दिसतंच आहे. ह्याउपरही आपली आज्ञा म्हणून मी आपली बाजू विलायतसरकारपुढें मांडायला जातों. पण आधींच सांगून ठेवतों कीं विलायतसरकार न्याय देईल ह्यावर आपण विसंबून बसतां कामा नये. छत्रपतींची राजवट कंपनीसरकारनें खालसा केली, तशीच पेशव्यांची नेमणूकही खालसा केली. कंपनी-सरकारचीं पावलं आजकाल कोणत्या दिशेनें पडत आहेत तें ओळखून आपणाही वागायला हवं. एकट्या दुकट्या छत्रपतीचा किंवा पेशव्याचा प्रश्न राहिलेला नाहीं हा आतां."

खरोखरच कंपनीसरकारच्या अंमलाखालीं सातारा येथील छत्रपतींच्या गादीचा झालेला चुराडा ही गोष्ट अजिमुल्लाखानासारख्या धीरवान कर्तबगार माणसालाही बेचैन करणारी होती. कारण साताऱ्याची गादी

हा हिंदवी स्वराज्याचा कल्पवृक्ष होता. आज तो इंग्रजी कारवाईच्या धगींत पोळून वठला असेल. परंतु सातार्‍याची गादी म्हणजे हिंदवी स्वराज्य-संस्थापक श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांची गादी. पुढें मराठी स्वराज्याचें मराठी साम्राज्य झालें; त्या मराठी साम्राज्याचा उगम सातार्‍याच्या स्वराज्य-गादींत होता. सातार्‍याची गादी हा ह्यामुळें एकट्या महाराष्ट्राचाच नव्हे तर सार्‍या स्वातंत्र्यप्रेमी भारताचा मानबिंदु होता. त्या मानबिंदूलाही ज्या इंग्रजांनीं धुडकावून लाविलें, ते इतरांची काय प्रतिष्ठा राखणार ? अजिमुल्ला-खानाचे मित्र आणि धनी ब्रह्मावर्तीचे श्रीमंत नानासाहेब पेशवे हे अस्तंगत मराठशाहीचे धनी खरे. परंतु सातार्‍याचे पदच्युत छत्रपति हे त्या मराठ-शाहीच्या धन्याचेही धनी होते. अशा धन्याच्या धन्यालाही न जुमानणारे अरेराव इंग्रज धन्याला कितीसे जुमानतील ह्याविषयींची अजिमुल्ला-खानाची शंका चुकीची नव्हती.

छत्रपति हे मराठशाहीचे सनदशीर धनी आणि पेशवे त्यांचे सर्वाधिकारी, असा छत्रपति शाहूच्या मृत्यूपासून मराठशाही कारभार चालला होता. कंपनीसरकारनें मराठशाहींतही 'फोडा आणि झोडा' ह्या भेदनीतीचा अंगीकार केला. प्रथम त्यांनीं छत्रपतीविरुद्ध पेशव्याला चिथावून हाताशीं धरून परस्पर पाहुण्याच्या हातानें साप मारला. छत्रपतींचे बहुतेक राज्याधिकार पेशव्यांनीं गुंडाळले आणि आपली ढांसळती बाजू सांवरण्यासाठीं इंग्रजांशीं निरुपायानें करारमदारही केले. त्या करारमदारांन्वयें इंग्रजांना छत्रपतीला न जुमानतां अखेरच्या कमकुवत पेशव्याला हाताशीं धरून मराठशाही आंतून अनेक परींनीं चांगली पोखरतां आली. इंग्रजांशीं पेशव्यांनीं केलेले करारमदार छत्रपतीला मान्य करणें भागच होतें. कारण पेशवे त्याचे सर्वाधिकारी कारभारी ! पेशव्यानें इंग्रजांशीं केलेले करारमदार नाकबूल करण्याची छत्रपतीची काय छाती होती !

अशा प्रकारें पेशव्याला पीळ पीळ पिळल्यामुळें पेशवा विचारा नाराजीनें कुरकुरूं लागला. तेव्हां तो आपल्या वाढत्या इंग्रजी साम्राज्यशाहीच्या

वाटेंतील कांटा दूर करण्यासाठीं इंग्रजांनीं पेशव्याविरुद्ध छत्रपतीला हाताशीं धरलें आणि चिथावायला सुरुवात केली. "आपण मराठशाहीचे मालक; छत्रपति. पेशवा आपला नोकर. तो शिरजोर झाला, तर त्याला काबूंत ठेवण्याचा पूर्ण अख्त्यार आपणाला आहे. कंपनीसरकारचं बळ मित्रभावानें आपल्या पाठीशीं सदा खडं आहे."

अशा प्रकारें छत्रपति आणि पेशवे, तसेच मराठशाहीचे शिंदे-होळकर-गायकवाडांदि अनेक मातबर सरदार ह्यांच्यांत आपसांत दुहीचा विस्तव फुंकण्याचा सपाटा इंग्रजांनीं चालविला. आणि अखेर छत्रपतीपरी छत्रपतीला व सरदारांपरी सरदारांना, अलग अलग पेंचांत पकडून एकमेकांना नकळत सर्वांचाच फन्ना उडविला.

मराठशाहीचा शेवटचा छत्रपति प्रतापसिंह. हा राजा मोठा उमदा आणि कर्तबगार होता. पण तो इंग्रजांच्या ताटाखालचें मांजर बनून दिवस काढायला राजी नव्हता, म्हणून तर तो कंपनीसरकारच्या डोळ्यांत सलूं लागला. त्याच्यावर त्यांनीं नाना कुभांडें रचलीं; आणि बळी तो कान पिळी ह्या न्यायानें त्याला अखेर छत्रपतीच्या गादीवरून खालीं ओढलें.

अजिमुल्लाखानानें ही छत्रपति प्रतापसिंहाची इंग्रजांनीं चालविलेली कुतरओढ पाहिली होती. रंगो बापूजीसारखीं निष्ठावंत कर्तबगार सेवकांचीं अव्वलीचीं मोहरीं इरेला घालूनही कांहीं देखील साध्य होणार नाहीं, अशी मुळापासूनच अजिमुल्लाखानाची खात्री होती. रंगो बापूजीला छत्रपतीचा वकील म्हणून विलायतेंत पाठविण्याचें घाटत होतें, तेव्हांपासून अजिमुल्लाखान तेंच म्हणत होता.

"असेल मनगटांत जोर, असेल तुम्हांला तुमच्या देशाची आणि देवाधर्माची चाड, तर अगोदर आपली एकजूट करा. राम-रहीम एक व्हा. आणि मरूं अथवा मारूं अशा निश्चयानें इंग्रजांविरुद्ध क्रांतीचा ध्वज

फडकविण्याला कंबर कसा. नुसत्या अशा विलायतच्या वाऱ्यांनीं काय होणार आहे ? उलट आपली अधिक नाचक्कीच होईल. ''

छत्रपतीनें रंगो बापूजीमार्फत विलायतेंत आपणावरील आगाळिकीची दाद मागण्याच्या खटपटीबाबत अजिमुल्लाखानाचें स्पष्ट मत असें होतें. त्याला, नानासाहेब पेशव्यांनीं ह्याउपर देखील तोच नेभळा मार्ग पत्करावा असें वाटेना. अखेर तो पेशव्यांचा वकील म्हणून विलायतेंत जायला मोठ्या नाखुषीनें तयार झाला खरा, परंतु तें कबूल करतांनाही तो नानासाहेबाला पुन्हा पुन्हा डलहौसीच्या सर्वभक्षक इंग्रजी साम्राज्यशाही धोरणाबद्दल उदाहरणें देऊन बजावीत होता.

डलहौसीनें एकामागून एक हिंदवी राज्यें खालसा करण्याचा कसा सपाटा चालविला आहे ह्याचे नानासाहेबापुढें पाढे वाचायला अजिमुल्ला-खानानें सुरुवात केली. तोंच झांशीकडील बातमी काढायला गेलेला जासूद दत्त म्हणून हजर.

कधींही कसल्याही प्रसंगाला न डरणाऱ्या त्या निधड्या छातीच्या जासुदाची चर्या कोमेजलेली पाहून येऊं नये ती शंका नानासाहेबांच्या मनांत आली. तरी मनाला धीर धरायला सांगत त्यांनीं जासुदाला विचारलें, “ काय बातमी ? ”

“ कंपनीसरकारनें झांशीचा घात केला ! ” जासूद उत्तरला.

“ काय – काय झालं ? ” अजिमुल्लाखान कान टवकारून नजर सताड ताणीत विचारूं लागला.

सावध नजरेनें आणि मनानें पाहात नानासाहेबांनींही तोच प्रश्न केला.

“ झांशीचा दत्तक सरकारनें नामंजूर केला. आणि झांशी संस्थान खालसा करण्याचा हुकूम सुटला आहे. ” जासूद उद्गारला.

“ पाहा ! मी सांगत होतों त्याची प्रचीति पाहा सरकार ! हा डलहौसी अजगर तुम्हां राजेरजवाड्यांना एकेकाला कसा हिकमतीनें गिळीत सुटला

आहे हें नीट पाहा. ह्या अजगराची भूक म्हणजे बकासुरी भूक आहे. कशी थांबणार ही भूक?" अजिमुल्लाखान म्हणाला.

"कशी थांबणार भूक? मित्रा! तूं म्हणतोस तें खरं आहे. ही बकासुरी भूक थांबण्याचीं लक्षणं दिसत नाहींत खरीं." नानासाहेब गंभीर चर्या करून अजिमुल्लाखानाकडे पाहात म्हणाले आणि थांबले. त्यांचें मन विचारानें भारावलें.

"बरं आहे. जा तूं. मग उद्यां आम्हांला भेटून तिकडची सारी हकीकत सांग." असें सांगून त्यांनीं जासुदाला निरोप दिला.

## स्वाध्याय

१. कंपनीसरकार आणि नानासाहेब पेशवे ह्यांच्या दरम्यान कसल्या वर्षासनाची भानगड होती?
२. नानासाहेब पेशव्याचा स्वभाव कसा होता?
३. विलायतेंत नानासाहेब अजिमुल्लाखानाला कशासाठीं पाठविणार होता? त्याबाबत अजिमुल्लाखानाचें काय मत होतें?
४. "डलहौसी ही सरकारच्या हातांतील कुऱ्हाड आहे" असें कोण म्हणाला? कां म्हणाला?
५. बंडाची भाषा कशी बोलावी, कां बोलावी, ह्याविषयीं कोण काय म्हणतो?
६. अजिमुल्लाखानानें नानासाहेबाला साताऱ्याच्या गादीचें उदाहरण कोणतें व कां दिलें?
७. रंगो बापूजीची माहिती द्या.
८. छत्रपति आणि पेशवे ह्या दोघांच्याही तोंडाला इंग्रजांनीं पानें पुसलीं हें खरें कीं खोटें? कसें?
९. प्रतापसिंह इंग्रजांना कां नकोसा झाला?
१०. झांशीची काय बातमी जासुदानें आणली? त्याचा नानासाहेबाच्या मनावर काय परिणाम झाला?





प्रकरण दुसरें

# आंत पेटलेली आग



जासूद गेला.

थोडा वेळ दोघेही सचिंतपणें स्वत:शीं विचार करीत गप्प बसले होते. अंत:करणांत आग पेटत होती.

" झांशीचा दत्तक देखील नामंजूर केला काय ? झांशी संस्थान खालसा केलं ? मनू ! मनू ! तूं एवढ्या मोठ्या झांशी राज्याची राणी होऊनही अखेर आज अशी उघड्यावर पडलीस ! .... असला जुलूम सहन करून चालायचं नाहीं. ह्यांतून वाट काढलीच पाहिजे. कंपनीसरकारला म्हणावं, जिथें सगळ्यांना खाऊन टाकणारे तुमच्यासारखे बकासुर निर्माण होतात, तिथें त्या बकासुरांची वाट लावणारे भीमही निर्माण होतात. "

नानासाहेब धगधगत्या आगीसारखे कंपनीसरकारवर चिडून बोलत होते. अजिमुल्लाखान स्तब्ध बसून ऐकत होता. कंपनीसरकारच्या

भारतांतील राजवटीच्या बैठकीखालीं नवी आग धुमसूं लागलेली त्याला नानासाहेबांच्या धगधगत्या नजरेंतून जाणवत होती.

" पाहूं आपण तें तशी वेळ आली कीं. बाकी तशी वेळ आजच आली आहे म्हणा ! ...." ते महालांतील भिंतींवर टांगलेल्या छत्रपति शिवाजी-महाराजांच्या, श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या तसबिरींवर नजर खिळवून बोलत होते.

" आपण सरकारला अखेरची संधि देऊं. विलायतसरकारला तरी पेशव्याची कदर करावीशी वाटते कीं नाहीं तें पाहूं. नाहीं तरी ...."

नानासाहेबांच्या तोंडचें तें वाक्य अर्धेंच राहिलें. त्यांनीं ओठावर ओठ घट्ट दाबीत आवेश आंतल्या आंत गिळला, त्यासरसें तें अर्धें वाक्यही गिळलें.

" जा, तुम्ही विलायतेला जाण्याच्या तयारीला लागा. लौकर एकदाचा काय तो सोक्षमोक्ष झालेला बरा. कीं पुढचा रस्ता मोकळा. "

आजवर नानासाहेब पेशव्यांना विलायतसरकारजवळ तरी आपणाला न्याय मिळेल ही वाटणारी आशा झांशीचें राज्य खालसा झालेलें ऐकल्या क्षणापासून वितळूं लागली होती. त्या निराशेची छाया त्याच्या आतांच्या उद्गारांवर पडलेली अजिमुल्लाखान स्पष्ट पाहात होता.

' पुढचा रस्ता मोकळा ' ह्या नानासाहेबांच्या उद्गारांत फार खोल अर्थ भरलेला होता. पण अजिमुल्लाखानाला तो अर्थ स्पष्टपणें कळत होता. आजच नव्हे, तर ह्यापूर्वींही अनेकदां ह्या तडफदार पेशव्यानें त्या रस्त्याकडे बोट दाखविलें होतें.

तेच उद्गार आजही त्यांच्या तोंडून ओघासरसे बाहेर पडले.

" ह्या कंपनीसरकारनें छत्रपतींना बुडवलं. दिल्लीची बादशाही सर्व बाजूंनीं पोखरून तिचा अगदीं लोळागोळा करून सोडला. शीखांचं राज्य बुडवून त्यांना गुलाम केलं. हिंदु, मुसलमान, शीख, अशा साऱ्यांनाच अलग अलग कोंडून त्यांचीं राज्यं गिळण्याचा सपाटा कंपनीसरकारनें

चालविला आहे. अशा वेळीं भारतांतील हिंदु, मुसलमान सारे एक होऊन ही जुलमी इंग्रजी सत्ता उलथून टाकतील, तरच तरणोपाय आहे ....”

अजिमुल्लाखानाचें तेंच ठाम मत होतें. ती सर्वांच्या एकोप्याच्या उठावाची शुभ वेळा लौकर येवो, असें मनांतून अल्लाला आळवीत तो विलायतेच्या मार्गाला लागण्यासाठीं नानासाहेबाचा निरोप घेऊन महालाबाहेर पडला.

शिवाजीमहाराज आणि समर्थ रामदास ह्यांच्या तसबिरींवर नजर खिळवून नानासाहेब एकटेच बराच वेळ कसला तरी दूरवरचा गूढ विचार करीत सुन्न बसले होते.

तोंच मध्यरात्र झाली. देवडीवर तासाचे ठोके पडले. आणि नानासाहेब मग झोंपेची आराधना करीत महालांत गेले.

परंतु महालांत देखील नानासाहेबांना झोंप कशी ती येईना. सभोंवार वणवा पेटून जाळायला जवळ जवळ येत असतांना त्या आगीच्या डोंबाळ्यांत त्यांना झोंप कशी येणार ?

“ हें सतीचं वाण योगायोगानें आपल्या वांट्याला आलं खरं. तें वाण एकदा पत्करावं लागल्यावर सती जातांना अंग भाजेल म्हणून मागें पाऊल घेऊन कसं चालेल ?” ते बिछान्यावर पडल्या पडल्या अजिमुल्लाखानाच्या तडफदार उद्गारांचा विचार करीत होते.

नानासाहेबांनाही अजिमुल्लाखानाचे विचार पटत नव्हते अशांतली गोष्ट नव्हती. तेदेखील तेव्हांच्या चालू इंग्रजी जमान्यांत चांगलेच रुळलेले होते. बहुतेक सारे मोठमोठे इंग्रजी अंमलदार त्यांचे चांगले परिचित होते. इंग्रज त्यांना मित्र म्हणत, म्हणून तेही इंग्रजांना मित्र म्हणत. पण ह्या इंग्रजी मैत्रीच्या पोटीं राजकारणी डावपेंचांचें काय काय काळेंबेरें आहे हें हा पेशवा चांगलें ओळखून होता. इंग्रज मात्र पेशव्याला नीट ओळखीत नव्हते. त्यांना वाटे, नानासाहेब पेशवा फार उमदा माणूस आहे. टोलेजंग मेजवान्या देतो, इंग्रजी करमणुकीच्या कार्यक्रमांत मनमोकळेपणानें

मिसळतो, आणि पाहुणचारालाही अगदीं लाख माणूस. दोस्त असावा तर असा असावा.

असलें खेळीमेळीचें वातावरण नानासाहेबांनीं आपल्या उमदेपणानें व उदारपणानें सभोंवर चांगलेंच निर्माण केलें होतें. तो उमदेपणा सतत कायम टिकविण्याचा ते आटोकाट प्रयत्न करीत. ते मनांत म्हणत कीं दगडाखालीं आपला हात सापडला आहे खरा. तो हळूहळू, गोडीगोडीनें सावधपणानेंच मोकळा करून घ्यायला हवा.

हा हात असा मोकळा होणें शक्य नाहीं, अशी पेशव्यांची खात्री पटली, पण केव्हां ? तर त्यांचे परलोकवासी दत्तक वडील बाजीराव रघुनाथ पेशवे मरण पावले, आणि पेशव्यांची सालीना आठ लाखांची जहागीर इंग्रजांनीं चुटकीसरशी खालसा करून घशांत टाकली, तेव्हां. तोंवर नानासाहेबांना आशा वाटत होती कीं आजचा आपला पडता काळ कांहीं असाच कायम राहाणार नाहीं. आपण काटकसरीनें वागून आपल्या दौलतींतील खजिना वाढवूं. त्या पैशाच्या जोरावर इंग्रजांच्या डोळ्यांवर येणार नाहीं अशा बेतानें फौजफाटा वाढवूं. आपली बाजू एकजुटीनें बळकट करूं आणि अनुकूल संधि आली कीं मायदेशाला इंग्रजी जोखडाखालून सोडवून स्वतंत्र करण्यासाठीं ‘ हर हर महादेव ’ गर्जत क्रांतीचा झेंडा उभारूं.

परंतु पुढें येणारा भविष्यकाळ इतकीं धिमीं पावलें टाकायला कुठें तयार होता ! तो झपाट्यानें पुढें पुढें येत होता. आणि आपल्याबरोबर निधड्या छातीनें स्वातंत्र्यसंगरांत उडी घेण्यासाठीं नानासाहेबांना हांका मारीत होता.

“ ये ! ये ! त्या वडिलार्जित वर्षासनाच्या मोहाच्या जाळ्यांत गुरफटून राहूं नकोस. तुझ्यासारख्या कर्तबगार माणसानें वडिलांच्या नांवावर अथवा धनदौलतीवर जगण्याचा मोह धरूं नये. वठलेल्या वृक्षाला पाणी घालून त्याची निगा करून त्याला नवी जोमदार पालवी थोडीच फुटणार आहे !

"सोड तो मोह. सोड ती इंग्रजी न्यायाची आशा. अरे असं पाहा, कीं कोण बरं हा ?

"तुझं घर लुटणारा चोर दरोडेखोर हा. हा त्या चोरीदरोडेखोरीबाबत तुला न्याय देऊं शकेल का ? असल्या खोट्या फसव्या आशा सोड. योगायोगानें तूं पेशव्याचा दत्तक पुत्र होऊन पेशवा झाला आहेस. तूं तेव्हां लहान होतास. तुला जगाचा बाजार तेव्हां कळत नव्हता. तुला तेव्हां वाटलं असेल कीं आपण पेशव्यांच्या मांडीवर दत्तक गेलों; श्रीमंत पेशवे झालों. पण तो आपल्या मस्तकावर चढविण्यांत आलेला पेशवाईचा मुकुट हिरेमाणकांनीं सजविलेला सोन्याचा मुकुट नसून कांटेरी मुकुट होता हें तुला आतां तरी कळलं ना ? त्या मुकुटाचा आतां तरी सुजाणपणानें मोह सोड आणि मावळलेल्या हिंदवी स्वराज्याला पुन्हा उदयाला आणणारा रंजल्यागांजल्या हिंदमातेचा सुपुत्र म्हणून मरणमोलानें मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं झगडायला छातीचा कोट करून पुढें ये. चल ऊठ !...."

वडिलार्जित वर्षासनाच्या वैभवाला इंग्रजी कारवाईनें मुकलेल्या त्या तेजस्वी तरुण पेशव्याला ती काळाची हांक ऐकूं गेली आणि त्यानें धीटपणें त्या हांकेला ओ दिलीही. अजिमुल्लाखान विलायतेंत गेला तरी त्याचाही रंगो बापूजीच होणार, हें ओळखून तो मनाशीं खूणगांठ बांधूं लागला, "इंग्रजी न्यायाच्या आशेवर मला मुळींच विसंबून बसतां कामा नये. जगांत न्याय समर्थांसाठीं असतो, दुर्बळांसाठीं नसतो. याचना करून कधीं खरा न्याय मिळत नाहीं. तो प्राणपणानें झगडून मिळवावा लागतो."

बस्स ! नानासाहेबांचा निर्धार झाला. तसें त्यांच्यासमोरील न्यायाचें क्षेत्रही विस्तृत झालें. तें चिमुकल्या पेशवाई जहागिरीपुरतें संकुचित उरलें नाहीं. तें त्याच्या मायदेशाइतकें विशाल झालें. त्यानें तेव्हांच मनोमन शपथ घेतली, "बस्स ! आपण व्यक्तीच्या वैभवासाठीं झटणं हें खरं वैभव नव्हे. परतंत्र राष्ट्र कधीं वैभवशाली होत नसतं. राष्ट्र वैभवशाली

नाहीं, तर त्या राष्ट्रांतील लोक तरी कोठून वैभवशाली होणार? स्वातंत्र्या-खेरीज वैभव नाहीं. ह्याकरितां देशाच्या स्वातंत्र्यासाठीं प्राणपणानें झगडण्याकरितां मी छातीचा कोट करून पुढें झालं पाहिजे. माझ्या देशबांधवांना हलवून जागं केलं पाहिजे ..."

त्या रात्रीं त्या तरुण वीराला झोंप तर लागली नाहींच पण झोंप घ्यावीशीही त्याला वाटेना. तो आतां जागत्या डोळ्यांनीं एकच विचार करूं लागला, " हें इंग्रजी राजवटीचं जोखड आम्हांला कसं झुगारून देतां येईल ? "

### स्वा ध्या य

१. 'आपण सरकारला अखेरची संधि देऊं' हे उद्गार कोणाचे? त्यांचा अर्थ काय?
२. '...पुढचा रस्ता मोकळा' ह्या नानासाहेबांच्या उद्गारांचा अर्थ अजिमुल्लाखानाच्या काय ध्यानीं आला?
३. 'सतीचें वाण' ह्याचा अर्थ स्पष्ट करा.
४. इंग्रज आणि नानासाहेब हे एकमेकांना कसे ओळखीत होते?
५. नानासाहेबांच्या मनांत क्रांतीचे विचार केव्हांपासून व कसे घोळत होते?
६. भविष्यकाळानें नानासाहेबांना हांक मारून काय सांगितलें?
७. नानासाहेबांच्या मनावर भविष्यकाळाच्या जाणिवेचा काय परिणाम झाला?
८. मग नानासाहेबांच्या मनांत कोणते विचार घोळूं लागले?





प्रकरण तिसरें

# कांट्याचा नायटा



इंग्रजी सत्ता उलथून पाडून भारताला स्वतंत्र करण्याचे घोर विचार नानासाहेब पेशवे आणि अजिमुल्लाखान ह्या दोघांचेच नव्हते. इंग्रजी राजवटींत सर्वतोपरी रंजल्यागांजल्या भारतांतील राजां-महाराजांच्या मनांत धुमसणाऱ्या असंतोषाचें तें प्रतिबिंब होतें. तें प्रतिबिंब केवळ त्या राजां-महाराजांच्याच असंतोषाचें नव्हतें. आम रयतेचा धुमसता मुका असंतोष त्यांत सरमिसळ झाला होता.

नानासाहेब आणि झांशीची राणी हीं दोघेंही डलहौसीच्या 'खालसा' धोरणानें आपल्या राजवैभवाला मुकलीं होतीं हें तर खरेंच. परंतु इंग्रजी जुलुमाचे ते कांहीं पहिलेच बळी नव्हते. अगोदर इंग्रजांनीं साताऱ्याच्या भोसले छत्रपतींना रसातळाला नेलें. तीच गत नागपूर—वऱ्हाडच्या भोसले

राजांची आणि तंजावरच्या भोसले राजांचीही केली. त्याच मालिकेंतले नानासाहेब पेशवे आणि झांशीची राणी हे अखेरचे पण अव्वलींचे बळी होते. मराठमोळ्या राजवटीवर इंग्रजांचा एवढा कटाक्ष असण्याचें कारण दिल्लीच्या बादशाहीलाही एका काळीं आपल्या मुठींत आणणारे हे रणगाजी मराठे. इंग्रजी राजवटीला जर भारतांत कडवा विरोध झाला तर तो मराठ्यांकडूनच, हें इंग्रज ओळखून होते. म्हणून ते भारतांतून मराठी राजवटीचीं पाळेंमुळें खणून टाकीत सुटले होते.

इंग्रज राज्यकर्ते दिल्लीच्या मोगल बादशाहीचें जळवांप्रमाणें रक्त शोषून तिला तसूतसूनें ठार करीत होते हें तर खरेंच. परंतु त्याखेरीज पंजाब, ब्रह्मदेश, सिकीम, अर्काट, संबळपूर, खैरपूर, वऱ्हाड–नागपूर, अयोध्या, अशा कितीतरी देशी राजेरजवाड्यांचीही इंग्रजांनीं अशी राजकीय आणि आर्थिक शिकार चालविली होती. कांहीं बळी पडले होते; कांहीं बळी पडण्याच्या मार्गावर होते.

पंजाब हा महाराणा रणजितसिंगासारख्या महान् पुरुषसिंहाचा देश. शीखांचा पंजाब. शीख जमातीच्या रक्तांतच शौर्य आणि लढवय्येगिरी भिनलेली. मोगल बादशाहीच्या जुलुमाला शीख पुरून उरले. शीखांचा नाना परींनीं छळ करून त्यांना नेस्तनाबूत करतां करतां औरंगजेब बादशाह स्वतः नेस्तनाबूत झाला. पण शीख मात्र टिकले इतकेंच नाहीं, तर बलिष्ठ झाले.

आपणाला भारतांत इंग्रजी साम्राज्य वाढवितांना शीख चांगलेच नडणार हें कंपनीसरकार पक्कें ओळखून होतें. परंतु रणजितसिंगासारखा सिंह समोर आपल्या अद्वितीय सामर्थ्याच्या डरकाळ्या फोडीत उभा होता, तोंवर त्याच्या पंजाबकडे वाकडा डोळा करून पाहाण्याचीही कोणा इंग्रजाची छाती झाली नाहीं. सगळे रणजितसिंगाला चांगलेच वचकून होते.

परंतु रणजितसिंग निजधामाला गेला आणि इंग्रजांना फावलें. शिंकें तुटलें आणि बोक्यांची धन झाली. सगळे शीख सरदार जे रणजित-

सिंगापुढें नीट वचकून शिस्तीनें वागत होते, ते रणजितसिंग वारतांच राजवैभव बळकावण्यासाठीं आपसांत भांडूं लागले. शीखांची एकजूट मोडली. कमालीची बेशिस्त शीखांत माजली. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसें झालें. इंग्रजांनीं हिकमतीनें पंजाबच्या कारभारांत आपला शिरकाव करून घेतला. कांहीं आपमतलबी फितुरांना पाठीशीं घातलें, आणि बाकीच्या शीखांना लढून, त्यांच्यांत भांडणें लावून असें नानापरींनीं पिळून झोडपून बेजार केलें. हळूहळू शीखांचा एकेक प्रांत अशा कावेबाजपणानें त्यांनीं घशांत टाकायला सुरुवात केली.

हें सारें कशासाठीं चाललें होतें? तर आपला दोस्त रणजितसिंग ह्याच्या पश्चात् त्याच्या अल्पवयी मुलाचें राज्य आबादी आबाद राखण्यासाठीं! त्यासाठीं केवळ पंजाबचा राज्यकारभार इंग्रजांनीं बळकावला. रणजितसिंगाची महाराणी जिंदा ही फसणारी स्त्री नव्हे, असें पाहून भलभलते खोटेनाटे आरोप तिच्यावर ठेवण्यांत आले आणि तिचा पुत्र पंजाबचा अल्पवयी राजा दुलीपसिंह ह्याच्या नांवानें हुकूम काढून तिला कैदेंत डांबलें. कांहीं दिवसांनीं तिच्यावर फितुरीचा आरोप ठेवून तिला हद्दपार केलें.

सिंहाचे छावे शीख असला जुलूम मुकाटपणें बरा सहन करतील! अनेकदा त्यांचा इंग्रजांशीं समरप्रसंग आला. पण आपसांतील फूट आणि इंग्रजांचा बलिष्ठपणा ह्यांपुढें त्यांचा कांहीं इलाज चालला नाहीं. प्रत्येक वेळीं ते हरतच गेले आणि प्रत्येक वेळीं इंग्रजी सत्तेचे पाश पंजाबसभोंवार अधिकाधिक जोरानें करकचून आवळले गेले.

अखेर पंजाब खालसा झाला. पंजाबचा नामधारी राजा दुलीपसिंह ह्याचें राज्य गेलें. कांहीं सालांसाठीं चार लाखांची नेमणूक त्याच्या वांट्याला आली. तीदेखील कधीं मिळे तर कधीं नाहीं.

पंजाब खालसा केल्यामुळें शूर शीखांच्या काळजाला झालेल्या जखमांच्या प्राणांतिक वेदनाही इंग्रजांना अपुऱ्या वाटूं लागल्या म्हणूनच कीं काय, डलहौसीच्या कारकीर्दींत दुलीपसिंहाला बाटवून ख्रिस्ती करण्यांत आलें.

त्याला दूर विलायतेंत एका गोऱ्या शिक्षकाच्या नजरेखालीं शिक्षणासाठीं म्हणून नेऊन डांबून ठेवण्यांत आलें. तो भारतांत राहिला, तर न जाणों ! त्याचें रणशूर शीख रक्त अन्यायाविरुद्ध उसळूं लागायचें. म्हणून त्याला बाटवून दूर विलायतेंत डांबून ठेवण्याची ही हिकमत. असा पंजाबचा निकाल लागला.

अशींच एकेक राज्यें कांहीं ना कांहीं खोट्यानाट्या कुरापती काढून खालसा करण्याचा सपाटा डलहौसीनें सुरू केला. साताऱ्याची छत्रपतींची गादी बुडवली. नागपूरचे भोसले राजे बुडवले. ब्रह्मदेशाच्या बाबतींत अशीच कांहींतरी कुरापत काढून दंडेलीनें तेंही राज्य भारतांतील इंग्रजी राजवटींत ओढून घेतलें.

हिमालयाच्या सावलीला असलेलें सिकीमचें राज्य बुडवायला असें कांहीं निमित्त नव्हतें. पण त्या राज्यांतलें दार्जिलिंग हें थंड हवेचें ठिकाण इंग्रजांना हवें होतें. विलायतच्या थंड हवेंत वाढलेल्या गोऱ्या इंग्रजी कातडीला भारतांतलें एकंदरींत उष्ण हवामान फारसें मानवत नसे. उन्हाळ्यांत तरी हवा खाण्यासाठीं थंड हवेचीं ठिकाणें त्यांना हवींच होतीं. म्हणून तो दार्जिलिंगचा टापू इंग्रजांना फार आवडला.

मात्र तो आवडला तो नुसता हवापाण्यासाठीं नव्हे. ती जमीन सुपीक, शेतकीच्या उत्पन्नाच्या दृष्टीनें उत्तम. शिवाय सिकीमचा तो टापू म्हणजे तर अगदीं मोक्याची जागा. एकीकडे नेपाळ आणि दुसऱ्या बाजूला भूतान हीं दोन स्वतंत्र राज्यें, आणि पलीकडे तिबेट. अशा तीन्ही राज्यांवर बगलेनजर ठेवायला सिकीमचें – दार्जिलिंगचें – उंचावरचें नाकें फार सोयीचें. म्हणून इंग्रजांना सिकीम फार आवडलें.

लगेच सिकीमच्या राज्याकडे मागणी. " दार्जिलिंगचा टापू तेवढा तुमच्या राज्यांत आम्हांला खंडानें द्या. सालीना सहा हजार रुपये खंड तुम्हांला देतों. "

त्या मागणीबरोबरच इंग्रज व्यापारी त्या टापूंत घुसून तेथें वस्ती करून लागवड करण्याच्या धोरणानें जमिनीची पाहाणी करूं लागले देखील! सिक्कीमच्या राजाला तें आवडलें नाहीं. त्यानें त्या गोऱ्या व्यापाऱ्यांना सांगितलें, "अगोदर तुम्ही माझ्या राज्यांतून बाहेर जा कसे! कोणाच्या परवानगीनें तुम्ही आंत घुसलां?"

पण इंग्रज एकदा आंत घुसले ते थोडेच असे बाहेर जातात! त्यांना उलट त्यांत अपमान वाटला. राजाला ह्या उद्दामपणाबद्दल शिक्षा म्हणून कंपनीसरकारनें त्याच्या राज्याचा हवा तेवढा भाग बळकावून घेतला.

भारतांत इंग्रजांचा प्रथम शिरकाव झाला तो अर्काटच्या नबाबामुळें. पण झाडानें लाकूडतोड्याला कुऱ्हाडीला दांडा घालण्यासाठीं फांदी दिली आणि मग लाकूडतोड्यानें तोच दांडा कुऱ्हाडीला घालून तेंच झाड तोडलें. अर्काटचा नबाब वारल्यावर त्याच्या गादीला वारस नाहीं म्हणून तें राज्यच खालसा!

तंजावरची मराठ्यांची गादी शहाजी राजे भोसल्यांनीं स्थापन केलेली. तेथले राजे भोसले निपुत्रिक वारले. त्यांच्या गादीला वारस नाहीं, म्हणून तें राज्य खालसा! वारस नाहीं म्हणावा तर तंजावरच्या शेवटच्या शिवाजी राजाला मुलगी होती. विलायतेंतही तेव्हां राजा निपुत्रिक मरण पावला, तेव्हां त्याची लेक व्हिक्टोरिया ही राणी झाली. पण तंजावरची राजकन्या मात्र वारस म्हणून राणी होण्याला लायक ठरली नाहीं. असा इंग्रजांचा कायदा स्वत:साठीं निराळा आणि इतरांसाठीं निराळा! अयोध्येच्या नबाबांचें राज्य बुडविण्यासाठीं इंग्रजांनीं फार दिवसांपासून रावणशाही माजविली होती. अखेर नबाबांच्या अयोध्येंत हे रावणच विजयी झाले. ते कसे, तें खुलासेवार आपण पुढें पाहूं.

अशींच आणखी अनेक राज्यें डलहौसीनें कांहीं ना कांहीं निमित्त ठेवून भराभर खालसा केलीं, आणि भारतांतील इंग्रजी राज्याला जोडलीं.

प्रथम इंग्रज भारतांत आले ते केवळ व्यापारासाठीं, आपली ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करून. व्यापार करतां करतां ते व्यापाराच्या सोयीसाठीं ठाण्यांमागून ठाणीं घेऊं लागले. मुलुख बळकावूं लागले. भटाला दिली ओसरी आणि भट हातपाय पसरी म्हणतात त्यांतली अवस्था. हातपाय पसरीत पसरीत दीडशें वर्षांत ते भारतांत मोठे बळी मातले. त्यांनीं बंगाल व्यापला. बंगालच्या नबाबाशीं पटेना म्हणून सन १७५७ सालीं त्याच्याशीं प्लासीला खडाजंगी लढाई केली. त्या लढाईत नबाबाचा मोड झाला आणि इंग्रज भारतांत राज्यकर्ते म्हणून मजबूत पाय रोंवून बसले.

तेव्हांपासून धीरेधीरे भारतांत इंग्रज राजवट पसरूं लागली. उण्यापुऱ्या शंभर वर्षांत ती चांगलीच पसरली. आतां इंग्रजांना भारतांत एकछत्री इंग्रजी साम्राज्य असावें अशी हांव सुटली. ती हांव राक्षसी होती. पण पोकळ नव्हती. ती पोकळ नव्हती, हें आपण आतांपावेतों पाहिलेंच. इतक्या वर्षांत इंग्रजांनीं भारतांतले राजेरजवाडे हरउपायांनीं आपल्या काबूंत आणले होतेच. मग त्यांना वाटूं लागलें, ही अडगळ आतां भारतांत हवी कशाला ? एकजात सारीं लहान मोठीं राज्यें जिंकून घ्यावीं आणि साऱ्या भारताला इंग्रजी साम्राज्यांत एक वसाहत म्हणून डांबून टाकावें. म्हणजे इंग्रजी व्यापाराला खंडप्राय भारताची प्रचंड बाजारपेठ आयती सत्तेची मोकळी झाली. कापूस, नीळ, खनिज पदार्थ, चहा, अशा हरेक जिनसांच्या कच्च्या मालाचा पुरवठा इंग्लंडला करणारा सत्तेचा देश झाला. व्यापारधंदा, नोकऱ्या, खाणी, शेतवाडी अशा अनेक परींनीं इंग्रजांना चरायला स्वतःचें सत्तेचें कुरण झालें.

भारतांतील कंपनीसरकारच्या राजवटीविरुद्ध भारतांत क्रांतीचें होमकुंड चेतवूं पाहाणारा असंतोष धुमसत होता, त्या असंतोषाचीं पाळेंमुळें इतक्या खोलवर भारतभर तेव्हां रुजलीं होतीं.

## स्वाध्याय

१. नानासाहेब आणि अजिमुल्लाखान ह्यांच्या डोक्यांत भारताच्या स्वातंत्र्याचे विचार कसे घोळूं लागले? त्या विचारांचें क्षेत्र किती व्यापक होतें?

२. डलहौसीच्या ‘ खालसा ’ धोरणाची थोडक्यांत माहिती सांगा.

३. शीखांचें राज्य डलहौसीने कां बुडविलें?

४. शीख आणि मोगल ह्यांचे संबंध कसे होते?

५. दुलीपसिंगाची इंग्रजांनीं कशी दशा केली?

६. सिकीमचें राज्य खालसा करण्याच्या मुळाशीं इंग्रजांच्या पोटांत खरें कारण कोणतें होतें?

७. अर्कॉटच्या नबाबाच्या उपकारांची फेड इंग्रजांनीं अपकारानें कशी केली?

८. तंजावर व अयोध्या हीं राज्यें इंग्रजांनीं कोणत्या हिकमतीनें बुडविलीं?

९. प्लासीच्या लढाईचें महत्त्व कां?

१०. प्लासीवरील इंग्रजांच्या विजयाचा साऱ्या भारतावर काय परिणाम झाला?





प्रकरण चौथें

# 'मेरी झांसी नहीं दूंगी !'



'डोंगरचे आवळे आणि सागरचें मीठ' म्हणतात त्यांतली अवस्था. कोठले नानासाहेब पेशवे, कोठली झांशीची राणी लक्ष्मी आणि कोठला अजिमुल्लाखान. दूरदूरच्या तीन ठिकाणांहून तिघें योगायोगानें जवळजवळ आलेलीं.

माथेरानच्या पायथ्याशीं वेणू खेडें आहे. तेथील गरीबशा भट्ट घराण्यांत नानासाहेबांचा जन्म झालेला. त्यांचें पाळण्यांतलें नांव धोंडू. त्याच दरम्यान शेवटचा बाजीराव पेशवा मराठशाही वैभवावर उदक सोडून ब्रह्मावर्ती येऊन राजवाडा बांधून राहूं लागला. तेव्हां त्याच्याबरोबर बरेच आश्रित महाराष्ट्रांतून ब्रह्मावर्ती गेले. त्यांत माधवराव भट्टही आपली पत्नी

आणि आपला रांगता बागडता मुलगा धोंडू असा परिवार घेऊन पेशव्यां-बरोबर होता. सन १८२७ मधली ही गोष्ट.

नवसाचा मुलगा म्हणून धोंडू नांव. पण एरव्हीं लेकरूं इतकें चपळ, इतकें तडफदार, इतकें गोंडस आणि गोड, कीं त्याला पाहातांक्षणीं बाजीराव पेशव्यांना वाटलें, आपल्या पोटीं पुत्रसंतान नाहीं, तरी हा पुत्र दत्तक घ्यावा.

लगेच त्याच वर्षीं जूनच्या सात तारखेला दत्तविधानाचा सोहळा साजरा झाला. पेशव्यांच्या ह्या दत्तक पुत्राचें नांव नानासाहेब पेशवे असें जाहीर करून साखर वांटण्यांत आली. तीन वर्षांचेंही वय नव्हतें तेव्हांपासूनच गरिबींत जन्मलेला नानासाहेब पेशवा राजवैभवांत ब्रह्मावर्तीं वाढूं लागला.

असाच मोरोपंत तांबे हा एक आश्रित वाराणशीला बाजीराव पेशव्यांचे बंधु चिमाजीअप्पा ह्यांच्या पदरीं होता. मोरोपंत आणि भागीरथीबाई ह्या जोडप्याच्या पोटीं वाराणशीला सन १८३५ मध्यें एक कन्या जन्माला आली. ती देखील जशी देखणी, तशीच बुद्धिमान् होती. मनू तिचें नांव.

मनू साडेतीन वर्षांची होते न होते, तोंच सारें तांबे कुटुंब वाराणशी सोडून ब्रह्मावर्ताला बाजीराव पेशव्यांच्या आश्रयाला गेलें. पेशव्यांना ही लहानगी गोड पोरगी इतकी आवडली कीं ते तिला कौतुकानें छबेली म्हणूं लागले. तेव्हांपासून ज्याच्या त्याच्या तोंडीं छबेली.

नानासाहेब आणि पेशवे घराण्यांतील इतर राजपुत्र ,ह्यांच्यांत छबेली मिळूं मिसळूं, खेळूं बागडूं लागली.

द्रौपदी आणि कृष्ण हीं जशीं धर्माचीं प्रेमळ भावंडें, तशीं नानासाहेब आणि छबेली हीं लहानपणापासूनच प्रेमळ बहीणभावंडें म्हणून एकत्र वाढूं लागलीं. सख्खीं भावंडें एकमेकांवर काय प्रेम करतील! इतकें त्या धर्माच्या बहीणभावंडांचें एकमेकांवर प्रेम होतें.

अशीं सुमारें तीन वर्षें लोटलीं. छबेली सात वर्षांची झाली. सात वर्षांची मुलगी म्हणजे तेव्हांच्या मानानें लग्नाला योग्य झालेली. पेशवाईच्या

चालत्या काळांत पेशव्यांच्या कृपेनें झांशीचे राजे म्हणून उदयाला आलेल्या नेवाळकर राजघराण्यांतील तेव्हांचे झांशीचे विद्यमान अधिपति श्रीमंत गंगाधरपंत नेवाळकर ह्यांच्याशीं छबेलीचा विवाह झाला. ती आतां छबेली राहिली नाहीं. त्या आतां झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब झाल्या.

नानासाहेब कांहीं उपजतच कंपनीसरकारचे शत्रु नव्हते. बाजीराव पेशव्याच्या हयातींतच ते कर्तेसवरते झाले होते. दौलतीचा कारभार पाहूं लागले होते. वर्षासनदार पेशवे म्हणून कां होईना, पण त्यांना सरकार-दरबारींही चांगला मानमरातब मिळत होता. त्या मर्यादित स्वरूपांत कां होईना, पण पेशवाईवैभव वंशपरंपरेनें आपलें आहे अशी त्यांची बाळपणीं दत्तविधान झाल्यापासून खात्री होती. जेते इंग्रज आणि जित पेशवे ह्या नात्याचा कडवटपणा हळूहळू लोपत होता. अनेक इंग्रज अधिकाऱ्यांचे हे तरुण पेशवे उदार मनाचे मित्र होते. हिंदी राजेरजवाड्यांवर इंग्रज राज्यकर्त्यांची वक्रदृष्टि वळूं लागली, तशा पारतंत्र्याच्या वेदना नानासाहेबांनाही झोंबूं लागल्या. घसघशीत आठ लाखांच्या वर्षासनाचें सुग्रास परंतु मेलेलें अन्न ग्वात आपण आयतोबासारखें स्वाभिमानशून्य आळशीपणानें कां म्हणून जगावें, ही बोंचणी त्यांच्या मनाला बोंचूं लागली होती. परंतु त्या वेदना फुंकर घालून सहन करीत ते आनंदानें जीवन कंठण्याचा आपल्या परीनें आटोकाट प्रयत्न करीत होते.

तथापि माणसाच्या सहनशीलतेलाही मर्यादा असते. बाजीराव पेशवे वारल्यानंतर कंपनीसरकारनें त्यांचें आठ लाखांचें वर्षासनही एकदम लेखणीच्या एका फटकाऱ्यासरसें बंद केलें, तेव्हां त्या तेजस्वी तरुण पेशव्याच्या सहनशीलतेची अगदीं परिसीमा झाली.

झांशीच्या राणी लक्ष्मीबाईचेंही तसेंच झालें. देशभर इंग्रज परोपरीनें रयतेची पिळणूक करीत होते. खालसाचा नंगा नाच घालीत होते. तरी

राणी तें सारें मुकाट्यानें सहन करीत होती. आणि तशी पाळी आपल्या झांशीवर येऊं नये ह्यासाठीं जपत होती.

परंतु तरीदेखील ती पाळी झांशीवर आलीच. तेव्हां मात्र राणी चिडली. तिनें पाहिलें कीं वाघ म्हटलें तरी तो आपणाला खाणार आणि वाघोबा म्हटलें तरी खाणार. मग धडधडीत वाघूट तरी कां म्हणूं नये? कंपनी-सरकार तरी आपलें आजवर वाटोळें झालें, त्यापेक्षां आणखी वाटोळें काय करणार आहे ?

झांशी संस्थान खालसा होणार, इंग्रज रेसिडेंटच्या साक्षीनें आपण रीतसर घेतलेला दत्तकही नामंजूर होणार, आणि झांशी आपल्या वैभव-सर्वस्वाला पारखी होणार, अशीं अशुभ चिन्हें राणीला पतिनिधनानंतर दिसूं लागलीं. तेव्हांपासून तिनें शक्य तितक्या सौम्यपणानें व समंजसपणानें तो कटु प्रसंग टळावा अशी सारी खटपट केली. तथापि त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. अखेर इंग्रज अधिकारी जेव्हां झांशीचें राज्यसर्वस्व खालसा करून ताब्यांत घ्यायला आले, तेव्हां मात्र राणीनें सिंहिणीप्रमाणें खवळून इंग्रज सरकारला बजावलें, " मैं मेरी झांसी नही दूंगी ! "

राणीनें खुषीनें झांशी इंग्रज सरकारच्या स्वाधीन केली नाहीं. इंग्रजांनीं राणीला धुडकावून झांशीचा ताबा घेतला. राणीला त्यांनीं राज्यावरून उठवून लावलें, एवढेंच नव्हे, तर राणीचें प्रिय दैवत जी महालक्ष्मी, त्या महालक्ष्मी देवीलाही राणीनें दिलेल्या दोन गांवांच्या इनामावरून उठवून लावलें. तीं दोन गांवेंही बळकावलीं.

तेव्हां मात्र राणीला वाटलें कीं ह्यापुढें आपलें स्वातंत्र्य आणि आपले देवधर्म ह्यांना एकदमच बुडवीत सुटलेल्या जुलमी इंग्रज सरकारचीं पाळेंमुळें भारतांतून खणून टाकलीं पाहिजेत. त्यासाठीं इंग्रजी जुलुमानें रंजल्या गांजल्या साऱ्या हिंदु-मुसलमानांनीं एकजूट केली पाहिजे. राम-रहीम एक झाले पाहिजेत. त्याखेरीज तरणोपाय नाहीं.

जसे नानासाहेब पेशवे अथवा झांशीची राणी लक्ष्मीबाई हीं दोघेंही गर्भश्रीमंत म्हणून जन्माला आलेलीं नव्हत, तसाच नानासाहेबांचा सहकारी सल्लागार अजिमुल्लाखानही. तो तर त्या दोघांपेक्षांही अतिशय गरिबींत जन्माला आलेला. हुशार, बुद्धिमान्, देखणा, चतुर, असे सारे गुण अंगीं असूनही अजिमुल्लाखानाला घरच्या कमालीच्या गरिबीमुळें लहानपणीं गोऱ्यांच्या बंगल्यांत बबर्जीचें आणि शागीर्दाचें काम करावें लागलें. पण इतकीं हलकीं कामें करतांनाही त्याचा स्वाभिमान, स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान आणि महत्त्वाकांक्षा गरुडभरारीनें उचंबळत.

बरें, अजिमुल्लाखान नुसता पोकळ अभिमान आणि वांझोटी महत्त्वाकांक्षा मनांत बाळगून दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसला नव्हता. इंग्रजांच्या पदरच्या नोकरीचा पुरेपूर फायदा घेऊन तो चांगलें इंग्रजी शिकला. फ्रेंचही चांगलें शिकला. नंतर बबर्जीची नोकरी सोडून कांहीं काळ इंग्रजी शाळेंतही गेला. शिकतां शिकतां इतका शिकला कीं कानपूरच्या इंग्रजी शाळेंत तो शिक्षक झाला.

अशा असामान्य आणि उमद्या माणसाची गांठ पडल्यावर नानासाहेबांनीं त्याला लगेच आपला मित्र म्हणून जवळ केला. थोड्याच दिवसांत तो त्यांचा मुख्य सल्लागार होऊन बसला.

आपला निष्णात वकील, आपला उजवा हात, म्हणून नानासाहेबांनीं अजिमुल्लाखानाला विलायतेला पाठविलें. त्यापेक्षां चांगली निवड त्यांना करतांच आली नसती.

अजिमुल्लाखान विलायतेला रवाना झाल्यावर नानासाहेबांनीं आपली सारी चिंता गिळली आणि प्रथम राणीचा समाचार घेतला. तीं दोघेंही धर्माचीं बहीणभावंडें तेव्हां अगदीं समदुःखी खरीं. परंतु तीं भेटलीं तेव्हां एकमेकांपाशीं दुःखानें कण्हत बसलीं नाहींत.

राणीनें नानासाहेबांना सारी कर्मकथा सांगून आपला निर्धार पुन्हा एकवार बोलून दाखविला, " मैं मेरी झांसी नही दूंगी !"

पण तो निर्धार बोलून दाखविला तो एखाद्या असहाय दुबळ्या स्त्रीच्या खिन्न वदनानें नव्हे. ती बोलली ती खवळलेल्या महिषासुरमर्दिनीच्या आवेशांत गर्जून बोलली.

त्या आपत्तीच्या वेळीं त्या दोघांच्या मानानें वडीलधारा तात्या टोपे हें 'झांकलें माणिक' पेशव्यांच्या पदरीं होतें. पण तो तेव्हां खानगीकडील साधा कारकून. आपली सेवकाची पायरी ओळखून तो मुकाटपणें आपल्या स्वामिनिष्ठेची पराकाष्ठा साधण्याची वाट पाहात बसला होता.

तसाच तो फैजाबादचा जहागीरदार मौलवी महंमदशाहा. अयोध्येच्या नबाबाचा तो मांडलिक. झाड कोसळलें तशी झाडाबरोबर फांदी कोसळली. आपली जहागीर बुडाली म्हणूनच केवळ नव्हे, तर ही इंग्रजी आपत्ति आपल्या साऱ्यांच्याच स्वातंत्र्यावर आणि देवधर्मावर आली आहे, ती साऱ्या हिंदु-मुसलमानांनीं एक होऊन प्राणपणानें टाळली पाहिजे, अशा तळमळीनें वृद्ध महंमदशाहा फकिरी पत्करून उठला होता. तो आतां जहागीरदार नव्हता. तो मौलवी बनून नानासाहेबादि क्रांतिकारक नेत्यांच्या हातांत हात घालून आगामी स्वातंत्र्ययुद्धाच्या तयारीला लागला होता.

### स्वाध्याय

१. नानासाहेब पेशवे आणि झांशीची राणी ह्यांचें पूर्ववृत्त सांगा.

२. 'मनू'ची 'महाराणी लक्ष्मीबाई' कशी झाली?

३. नानासाहेब आणि इंग्रज ह्यांचे संबंध केव्हांपासून बिघडूं लागले?

४. झांशीची राणी इंग्रजांवर कां चिडली?

५. राज्य खालसा झालें, ह्याचा राणीवर काय परिणाम झाला?

६. अजिमुल्लाखानाची माहिती सांगा.

७. पेशव्यांच्या पदरचें 'झांकलें माणिक' कोणतें? कसें?

८. मौलवी महंमदशाहा क्रांतिकारक कसा बनला?





प्रकरण पांचवें

# ही रामाची अयोध्या



दिल्लीची मोगल बादशाही कोलमडून पडली. वृक्ष वठला. पण तो वडाचा वृक्ष. मूळ खोड वठलें तरी त्याच्या पाळां-पारंब्यांना आधारून वाढीला लागलेलीं इतर वडांचीं झाडें उभीं होतींच. अयोध्येच्या नबाबाची उत्तर भारतांतील राजवट ही अशा झाडांपैकींच एक मोठ्यांत मोठें झाड होय. अयोध्या हें रामाच्या वेळचें नांव तेवढें राज्याला बाकी राहिलें होतें. परंतु अयोध्येच्या नबाबाची राजधानी लखनौ ही होती.

अयोध्येच्या नबाबाचा आणि इंग्रजांचा संबंध आला तो प्लासीच्या लढाई-नंतर. म्हणजे राज्यकर्ते म्हणून इंग्रजांचे पाय बंगाल्यांत रोवले गेल्यानंतर सात वर्षांनीं सन १७६४ सालीं आला.

इंग्रजांचा देशी राजेरजवाड्यांशीं संबंध म्हणजे लांडग्याची कोंकरांशीं मैत्री, हें आतां नव्यानें सांगायला नकोच. देशी राजेरजवाड्यांना गिळण्याची तैनाती फौजेची नवी युक्ति इंग्रजांनीं शोधून काढली होती. प्रथम राजाची चोहोंबाजूंनीं कोंडी करायची. फोडा आणि झोडा ह्या तत्त्वानुसार त्याला बाकीच्या राजेरजवाड्यांपासून अलग पाडायचा. राजेराजे आपसांत भांडूं लागले कीं एकाला 'धर' म्हणून आणि दुसऱ्याला 'पळ' म्हणून तीं भांडणें चेतवायचीं. भांडून भांडून म्हणा किंवा राज्यांतील इतर सांवळ्या गोंधळा-मुळें म्हणा, शिकारीसाठीं हेरलेल्या राजाचीं हाडें चांगलीं खुसळून निघालीं कीं मित्र म्हणून त्याच्या मदतीला धावून जायचें. मदत करतां करतां त्या राजाला आपली गोरी मदतनीस फौज पदरीं ठेवायला भाग पाडायचें. त्या फौजेचा सारा खर्च त्या राजानें सोसायचा; फौजेवर हुकमत मात्र इंग्रजांची. ही जांवई फौज ज्याचें अन्न खाणार त्याच्या बाजूनें लढणार. पण केव्हां? इंग्रज सांगेल तेव्हां. इंग्रजांशींच कटकटीचा प्रसंग आला तर मात्र ती फौज इंग्रजांशीं कधींच लढायची नाहीं. तात्पर्य, दुभती म्हैस आमची; पण ती तुमच्या गोठ्यांत तुमची म्हणून आम्ही आणून बांधतों. चारा तुम्हीं घालायचा आणि धार आम्हीं काढायची. अशी ही गोरी जांवई फौज म्हणजे तैनाती फौज. भारतांतल्या बहुतेक मातबर राजेरजवाड्यांना इंग्रजांनीं जेरीला आणलें तें असलें तैनाती फौजेचें अवजड लोढणें त्यांच्या गळ्यांत बांधून.

अयोध्येच्या नबाबाशीं इंग्रजांचा संबंध आला तोदेखील असाच. नबाबाला इंग्रजांची मदत घेण्याखेरीज इलाज उरला नाहीं. तेव्हां त्याला तैनाती फौज पदरीं ठेवून घ्यावी लागली. आणि त्या फौजेचा सालीना सोळा लाख रुपये खर्च नबाबाच्या डोक्यावर बसला. नबाबही राज्यांतील अव्यवस्थेनें अगदीं खिळखिळा झाला होता. त्याचे जमीनदार, सरदार, जहागीरदार देखील त्याला जुमानीतनासे होऊन शिरजोरपणानें वागूं लागले होते. रयतही गांजली गेल्यामुळें सरकारसारा वेळेवर देऊं शकत नव्हती.

ह्या साऱ्यांना जरबेंत ठेवून राज्याचा वसूल करायला नबाबाला तैनाती दहशत आपल्या बाजूनें उभी करणें अवश्य झालें होतें.

तैनाती फौजेच्या मदतीनें नबाबाला आपल्या राज्याची पिळणूक करून पैसा वसूल करतां येऊं लागला खरा. पण तो वसूल झाला तरी कुंपणानें शेत खावें तसा.

पण इंग्रज सावकार मदत करायला जवळ उभे होतेच. त्यांनीं नबाबाला सांगावें, " डरतां कां ? आम्ही तुम्हांला कर्ज देतों ना ! "

असे कोट्यवधि रुपयांच्या इंग्रजी कर्जाचे डोंगर नबाबाच्या डोक्यावर वाढूं लागले. त्याच्या फेडीसाठीं नवा नवा पैसा उभारणें भाग झालें. आधींच रयत गांजलेली, तशांत इंग्रजांचा हात असा नबाबाच्या कारभारांत शिरल्यापासून इंग्रजांच्या खाबूपणामुळें दिवसेंदिवस रयतेचे हाल कुत्राही खाईनासा झाला. तेव्हां नबाब आणि इंग्रज ह्यांच्यांत सन १८०१ मध्यें नवा तह झाला. त्या तहानें नबाबाला आपल्या अडचणी तात्पुरत्या दूर झाल्यासें वाटलें. पण खरोखर इंग्रजी पिळणुकीचा फांस त्यामुळें नबाबाच्या मानेला अधिक करकचून आंवळला गेला. नबाबाला राज्यकारभार नीट करतां येत नाहीं, पैसा वसूल होत नाहीं, आणि आपल्या कोट्यवधि कर्जाला त्यामुळें धोका. म्हणून इंग्रजांनीं बराचसा कारभार आपल्या हातीं घेतला.

ज्या कारभारांत इंग्रज पडला, त्या कारभाराचें वाटोळें, हें समीकरण देशी राजे आणि इंग्रज ह्यांच्यांत आतां अगदीं ठरून गेल्यासारखें होतें. त्याच ब्रीदाला इंग्रज अयोध्येंतही पुरेपूर जागले. कारभार कमालीचा घोटाळ्याचा झाला. तेव्हां ' अयोध्येच्या प्रजेच्या कल्याणासाठीं ' इंग्रजांना नबाबाचा राज्यकारभार पूर्वीपेक्षांही अधिक हातीं घ्यावा लागला. नांव नबाबाचें आणि गांव इंग्रजांचें अशी अवस्था झाली. नबाबानें इंग्रजांशीं नवा मित्रत्वाचा तह सन १८३७ मध्यें करून काय साधलें तें हें. तेव्हां नवा नबाब वाजीदअल्ली गादीवर आला होता.

असा इंग्रजी कारभार अयोध्येंत सुरू झाला. कावळ्यांचा दरबार झाला कीं तो कसा चालत असतो हें निराळें सांगायला नकोच.

असें नबाबाचें अयोध्येचें राज्य सर्व बाजूंनीं अगदीं खिळखिळें झालें. आणि जखमेवर बिब्बा उतावा तसा लॉर्ड डलहौसी हा विलायतेंतून ‘ खालसा ’चा मंत्र घेऊन भारतांत गव्हर्नर जनरल होऊन आला. पण त्याच्या गोऱ्या पायांची काळी सावली अगोदरच अयोध्येच्या नबाबावर पडली होती. ‘ तुमचा राज्यकारभार असाच अव्यवस्थितपणें चालला, तर कंपनीसरकारला सर्व राज्यकारभार नाइलाजानें हातीं घ्यावा लागेल. ’ अशी निर्वाणीची इंग्रजी धमकी अगोदरच नबाबाच्या कानीं आली होती.

आणि डलहौसी आला. तो जो आला तोच मुळीं लखनौच्या राज्याचा ‘ खालसा ’शाही नायनाट करण्याच्या तयारीनें. धमक्या, दटावण्या, लांचलुचपती, असे नाना परींचे ओंगळ उपाय योजून नबाबाची राजसत्ता सर्व बाजूंनीं पुरी पांगळी करण्यांत आली. नबाबाच्या महत्त्वाच्या बगल-बच्चयांना फितूर करण्यासाठीं जशी इंग्रजांनीं लांच दिली, तशीच नबाबाच्या बगलबच्चयांनीं राज्य खालसा होऊं नये म्हणून इंग्रजांनाही दिली. अगदींच एका हातानें टाळी वाजली नाहीं. सन १८५५ च्या ऑगस्ट महिन्यांत लखनौमध्यें अशा शेलक्या नबाबी लोकांची एक गुप्त सभा झाली. त्या सभेंत ‘ पंधरा लाख पौंड इंग्रज अधिकाऱ्यांना लांच देण्यासाठीं जमवून खर्च करावे, आणि चळवळ करून अयोध्येचें राज्य वांचवावें ’ असें ठरलें. कासीम नांवाचा एक पुढारी त्या सभेंत म्हणाला, “ इंग्रजांना सोन्याची आणि आम्हांला स्वातंत्र्याची चटक आहे. तेव्हां आपण इंग्रजांना आपल्या खासगींतून सोनें देऊं आणि आपलें स्वातंत्र्य राखूं. ”

परंतु इंग्रजांना नुसतें सोनें नको होतें. त्यांना काय पाहिजे होतें, तें त्यांच्या सरकारी कागदपत्रांतील—‘ ब्लू ’ बुकांतील पुढील एका लहानशा उताऱ्यावरूनही आपणाला कळून येईल.

" ....ह्या सुंदर भूमींत कोठेंही जा. अवघ्या दहावीस फुटांवर पाणीच पाणी. हा सारा प्रदेश अतिशय नयनमनोहर आहे. रानावनांत जाऊन पाहा, उंचच उंच वाढलेलीं बांबूचीं रानें तुम्हांला पालवतांना दिसतील. जिकडे तिकडे रमणीय आंबरायांची घनदाट छाया दिसेल. सोन्याच्या तुकड्यासारख्या सुपीक जमिनींत भरघोंस शेतें पिकून डोलतांना दिसतील. चिंचांच्या विशाल वृक्षांची मांडव घातल्यासारखी थंडगार सावली. नारिंगीच्या फुलांफळांचा जिकडे तिकडे घमघमाट. गोड टपोऱ्या अंजिरांनीं बहरलेले अंजीर वृक्ष. आणि साऱ्या वातावरणांत दरवळणारा पुष्पपरागांचा सुगंध अशी ह्या निसर्गसुंदर सुपीक भूमीच्या सौंदर्यांत जिकडे तिकडे भर पडलेली दिसते."

असली ती अयोध्येच्या राज्याची सुवर्णभूमि सन १८५६ मध्यें डलहौसीनें 'खालसा' करून लाटली आणि नबाबाला बुडविलें, ह्यांत नवल नाहीं.

अयोध्येच्या लोकांत त्यामुळें कमालीचा असंतोष पसरून इंग्रजी राजवट उलथून पाडण्यासाठीं गुप्त कट-कारस्थानें सुरू झालीं.

### स्वाध्याय

१. अयोध्येचे नबाब आणि इंग्रज ह्यांचा संबंध केव्हां आणि कसा आला ?
२. 'इंग्रजांचा देशी राजेरजवाड्यांशीं संबंध म्हणजे लांडग्याची कोंकरांशीं मैत्री' ह्या वाक्याचा अर्थ उदाहरणें देऊन स्पष्ट करा.
३. तैनाती फौज म्हणजे काय ? इंग्रजांनीं ती युक्ति कां काढली ?
४. अयोध्येच्या नबाबानें तैनाती फौजेचा कसा उपयोग करून घेतला ?
५. तैनाती फौजच अखेर नबाबाच्या अंगाशीं कशी आली ?
६. लखनौमधील नबाबी लोकांच्या गुप्त सभेची माहिती सांगा.
७. इंग्रजांना संपत्ति-सोनें नको असून अयोध्येचा मुलुखच कां पाहिजे होता, ह्याचें साधार स्पष्टीकरण करा.
८. अयोध्या खालसा झाल्याचा परिणाम तेथील जनतेवर काय झाला ?





प्रकरण सहावें

# सुरुंगाच्या वातीवर ठिणगी



नानासाहेब पेशवे काय, झांशीची राणी काय, अजिमुल्लाखान काय, किंवा देवळें आणि मशिदी, तीर्थक्षेत्रें आणि दर्गे ह्यांना भक्तिभावानें भजणारे पंडे, पुजारी, मुल्ला, मौलवी, साधुसंत, फकीर, अवलिया काय, ह्या सर्वांनाच इंग्रजी अंमलाचा तिटकारा वाटूं लागला. त्या तिटकाऱ्याच्या मुळाशीं हिंदु-मुसलमानांची जाज्ज्वल्य स्वदेशप्रीति आणि स्वधर्मप्रीति होती. इंग्रजी अंमल हा आपल्या स्वातंत्र्यावर आणि आपल्या देवाधर्मावर उघड उघड घाला होय अशी सर्वांची भावना होती, ती मुळींच चूक नव्हती. हिंदु-मुसलमान राजेरजवाडे, सरदार जहागिरदार ह्यांच्या उदार आश्रयामुळें देवाधर्माची प्रतिष्ठा देवस्थानांत, दर्गे-मशिदींत आणि तीर्थक्षेत्रादि यात्रा-स्थानीं चांगली टिकून भरभराटून होती. ते राजेरजवाडे नवाब-बादशाहाच

इंग्रजांनीं भिकेला लावले. त्यामुळें राजाश्रय आपोआपच ओसरला ; आणि देवाधर्माची दैना उडूं लागली. स्वराज्याखेरीज स्वधर्माला खरा आधार नाहीं हें सर्वांना कळून आलें.

इंग्रजी राजवटीचा हिंदु-मुसलमानांच्या स्वातंत्र्याबरोबरच देवाधर्मावरही घाला पडला तो केवळ ह्याच अर्थानें नसेल. परंतु तो जबरदस्त घाला होता ह्यांत संशय नाहीं. आणि तो घाला योजनाबद्धही होता. आफ्रिका, अमेरिका येथें इंग्रजांनीं हा उपाय चांगला तावूनसुलाखून पाहिला होता. तेथें त्यांना मूळच्याच अजाण मागासलेल्या लक्षावधि लोकांना आपल्या खिस्ती धर्माच्या कळपांतील मेंढरें बनवून सोडण्यांत चांगलेंच यश लाभलें होतें. तेव्हांपासून इंग्रजी धोरण ठरून गेलें होतें कीं कोणताही देश व्यापाराच्या अथवा लढाईच्या जोरावर जिंकून आपल्या टाचाखालचें मांजर बनवायचा, तर आघाडीला आपले खिस्ती मिशनरी पाहिजेत.

भारतांत ह्याच धोरणानें पोर्तुगीज इंग्रजांच्याही अगोदर खिस्ती धर्माचें हिकमती जाळें फेकीत आले होते. इंग्रजांच्या सुधारणेंतील आघाडीपुढें आणि व्यापारी कावेबाजपणापुढें पोर्तुगीज, फ्रेंच, डच अशा बाकीच्या साऱ्या युरोपियन गोऱ्यांना आपला गाशा गुंडाळावा लागला हें खरें. परंतु ते गेले, तरी भारतांत त्यांनीं जिकडे तिकडे युक्तीनें अथवा सक्तीनें पसरून ठेवलेलें खिस्ती धर्माचें जाळें कायम होतें. त्या अनुभवावरून इंग्रज आक्रमकांनीं असा कयास बांधला होता कीं खिस्ती धर्माची मजबूत पकड बसवून भारतांतील हिंदु धर्माला किंवा मुसलमानी धर्माला मजबूत शह देणें अगदीं सोपें. भारत हा पडला खंडप्राय विशाल देश. येथील हिंदु, मुसलमान, सारा बहुजनसमाज अतिशय मागासलेला. खिस्ती धर्माची शिकवण आपण मिशनरी कावेबाजपणानें बहुजनसमाजावर लादली, तर त्यांना आपल्या पाश्चात्य सुधारणेची थोरवी पटूं लागेल, गोडी वाटूं लागेल. ते मग देवळें-मंदिरें-मशिदी-तीर्थक्षेत्रें सोडून खिस्ती प्रार्थनामंदिरांच्या—

चर्चच्या एकसंधी छायेखालीं येतील. वेद, कुराण, वगैरे पवित्र ग्रंथांपेक्षां त्यांना बायबल हा ग्रंथ अधिक आदरावासा वाटूं लागेल.

शितावरून भाताची परीक्षा करायची, तर अशी. सन १८३६ मध्यें भारतीयांना इंग्रजी शिक्षण देण्यासाठीं बंगालमध्यें पहिली शाळा उघडली गेली तेव्हांच मेकॉलेनें इच्छा दर्शविली होती, ती अशी ' ही माझी शिक्षण-योजना नीटपणें अंमलांत आणली गेली तर पुढील तीस वर्षांत बंगालमध्यें एकही मूर्तिपूजक ( अर्थात हिंदु ) शिल्लक उरणार नाहीं. '

इंग्रज सरकार डलहौसीच्या हातानें भारतावरून ' खालसा 'चा नांगर सर्रास फिरवूं लागलें, तेव्हां भारतांत सर्वत्र असंतोष धुमसूं लागल्याची जाणीव विलायतेंतही झाली होती. भारतांत क्रांतीचा वणवा भडकण्याच्या सुमाराला विलायतेंतील पार्लमेंटांत कंपनीसरकारच्या संचालक मंडळाचा अध्यक्ष मँग्लेज ह्यानें उघड उघड बोलून दाखविलें कीं भारताच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापावेतों ख्रिस्ताचा धर्मध्वज विजयश्रीनें फडकत राहावा ह्यासाठींच भारताचें विराट साम्राज्य परमेश्वराच्या कृपेनें इंग्लंडच्या हातीं आलें आहे. ह्यासाठीं संपूर्ण भारत ख्रिस्ती करण्याच्या कामीं कोणाकडून कोणत्याही प्रकारें चेंगटपणा होतां उपयोगी नाहीं.

कंपनीसरकारनें भारताला ख्रिस्ती करून सोडण्यासाठीं जें एवढें कंकण बांधलें होतें, त्यांत फार महत्त्वाचा खोल अर्थ भरलेला होता. भारतांतील हिंदु धर्म एकदा बुडाला कीं धर्माबरोबर राष्ट्राभिमानदेखील मावळेल. मग भारत जिंकून घ्यायला अगदीं सोपा. असा तो आडाखा होता. एका प्रसिद्ध मिशनऱ्याच्या शब्दांत भारताबाबतचें इंग्रजी अंतरंग स्पष्टपणें दिसतें तें असें : ' आमच्यावर दुर्दैवाची कोणतीही आपत्ति कोसळो. जोंपावेतों भारतांत आमची साम्राज्यसत्ता सुरू आहे, तोंपावेतों भारतांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणें हाच आपला मुख्य उद्देश असला पाहिजे. कन्याकुमारीपासून हिमालयापावेतों सारा भारत ख्रिस्ती झाला नाहीं, आणि त्यानें हिंदु धर्म व इस्लाम ह्यांचा निषेध केला नाहीं, तोंवर आपले प्रयत्न

अखंड चालले पाहिजेत. ह्यासाठीं आपणाला जी जी कांहीं खटपट करतां येईल, ती सर्व बाजूंनीं आपण केली पाहिजे. सर्व सत्ता आणि सामर्थ्य ह्यासाठीं खर्च केलें पाहिजे. पूर्वेकडील जगांत भारत हें एक वैभवशाली राष्ट्र आणि ख्रिस्ती धर्माचा बलाढ्य बालेकिल्ला बनलें पाहिजे. तोंवर आपल्या प्रयत्नांत खंड पडतां कामा नये. अशा दुर्दम चिकाटीनें जर आपण प्रयत्न केले, तर परमेश्वराच्या कृपेनें आपण अखेर नक्की यशस्वी होऊं.'

लॉर्ड डलहौसीच्या भारतांतील इंग्रजी साम्राज्यविस्तारामागील हेतु परंपरेनेंच इतका खोल होता. भारतांत इंग्रजांनीं ज्या ज्या सामाजिक सुधारणा म्हणून केल्या, त्यांतही भारतांतील सुजाण जनतेला हाच मिशनरी डाव दबा धरून बसलेला दिसला. हिंदु समाजांतील सतीच्या क्रूर चालीला इंग्रज सरकारनें कायद्यानें बंदी केली, तेव्हां त्याचाही अर्थ सनातनी हिंदु समाजानें हिंदुधर्मावर घाला पडला असाच घेतला. संशय बळावला. धर्मान्तरितांना म्हणजे हिंदु धर्म सोडून दुसरा धर्म स्वीकारणारांना आपल्या पूर्वधर्मांतील मालमत्तेला मुकावें लागे. ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला तीही एक अडचण होती. कंपनीसरकारनें त्यासाठीं नवा कायदा करून धर्मान्तरितांचा त्यांच्या पूर्वींच्या मालमत्तेवरील हक्क नष्ट होणार नाहीं असा स्पष्ट निर्वाळा दिला. हाही हिंदु धर्मावर घाला होय असाच अर्थ जनतेनें घेतला. असा संशयानें संशय वाढत चालला.

लॉर्ड डलहौसी भारतांत ' खालसा 'ची अशी जाळपोळ करून माघारा गेला. त्याच्या ऐवजीं लॉर्ड कॅनिंग हा भला गव्हर्नर जनरल आला. ह्या भल्या माणसानेंही भारतांतील ख्रिस्ती मिशनरी संस्थांना हजारों रुपयांची खैरात मुक्त हस्तानें वांटली. मग भारतांतील रयतेला इंग्रजांच्या हेतूविषयीं संशय कां येणार नाहीं? भारताच्या पैशानें भारतांतील धर्मांना खच्ची करण्याच्या डावपेचांकडे दुर्लक्ष करणें भारताला अशक्य होतें.

हिंदी लष्करांतही आधींच असंतुष्ट असलेल्या हिंदी शिपायांना आपल्या धर्मावर घाला घालण्याचा इंग्रज प्रयत्न करीत आहेत असा संशय घेण्याला

जागा मिळूं लागली. एखादा हिंदी शिपाई बाटला, ख्रिस्ती झाला, कीं गोऱ्यांनीं त्याची वाहवा करावी. सरकारनें त्याला एकदम बढती द्यावी. आर्थिक अडचणींनीं गांजलेला शिपाई असे, तोच असें धर्मांतर कधीं कधीं करी. पण शिपायांना अशीं आमिषें दाखवून त्यांच्या गरिबीचा फायदा घेऊन आपण थोड्याच दिवसांत सारें हिंदी लष्कर ख्रिस्ती करून सोडूं अशी कंपनीसरकारला आणि त्याच्या मिशनऱ्यांना मोठी उमेद होती. असें एकदा भारताचें लष्कर ख्रिस्ती झालें कीं सारें राष्ट्र ख्रिस्ती करून सोडण्याचा प्रश्न पुढील कांहीं दिवसांत सहज सुटणारा आहे, असें त्यांना वाटत होतें. त्यासाठीं लष्करांत जेवढी बाटवाबाटवी करतां येईल तेवढी करण्याकडे गोरे लष्करी अधिकारी आणि त्यांचे हस्तक ख्रिस्ती मिशनरी ह्यांचें लक्ष वेधून राहिलें होतें. हिंदी लष्करी शिपाई, मग तो हिंदु असो कीं मुसलमान असो, स्वभावतःच धार्मिक वृत्तीचा. तो असले प्रकार पाहून संशयित, भयभीत आणि असंतुष्ट झाल्याखेरीज कसा राहील ?

कांहीं हिंदी लष्करी शिपाई तर विशेषच धर्मभोळे असत. त्यांना लष्करांतील इंग्रजी शिस्त पाळतांना आपली जात बुडते, आपला धर्म बुडतो, असें वारंवार अनुभवण्याची पाळी येई. चोहोंकडून गरिबीनें गांजलेल्या अर्धपोटी शिपायाचें धार्मिक मन स्वाभाविकपणेंच अधिक हळुवार झालेलें असतें. आणि शेतकरी भारताचा हिंदी शेतकरी गांवची शेतवाडी व गांवधंदे सोडून लष्करांत शिरे तो कां ? तर घरीं, गांवीं आपलें आणि आपल्या बायकामुलांचें पोट भरत नाहीं म्हणून. पण तेथें त्याच्या धर्मभावना दुखविल्या जाऊं लागल्या. त्याच्या दुःखावर डागण्या बसूं लागल्या. त्या दुःखदायक होऊं लागल्या. कां ? तर कंपनीसरकार काळे हिंदी शिपाई आणि गोरे शिपाई ह्यांना वागवितांना अतिशय भेदभाव करूं लागलें म्हणून.

असा हिंदी लष्करी शिपाई सर्व बाजूंनीं कष्टी ,आणि असंतुष्ट झाला होता. तोंच हिंदी लष्कराला कलकत्त्याजवळच्या दमदम येथील दारूगोळ्याच्या कारखान्यांत तयार करण्यांत आलेलीं नवीं काडतुसें वापरायला

देण्यांत येऊं लागलीं. तीं काडतुसें दांतांनीं तोडून बंदुकींत भरावीं लागत. त्यांना चरबी चोपडलेली असे. ती चरबी गायीची आणि डुकराची अशी सरमिसळ असते, असा हिंदी लष्करांत सगळीकडे खरा कीं खोटा नकळे परंतु बोभाटा झाला. गाय हें हिंदूंचें पवित्र दैवत आणि डुकर हा मुसलमानांच्या दृष्टीनें अगदीं त्याज्य पशु. अशी ही गायीडुकराची चरबी चोपडलेलीं काडतुसें सरकार आपल्याला दांतांनीं तोडून वापरायला लावणार !

अगोदरच इंग्रजांविषयीं संशयग्रस्त आणि असंतुष्ट असलेल्या साऱ्या हिंदु-मुसलमान लष्करी शिपायांना ही काडतुसांची कहाणी ऐकून वाटूं लागलें कीं आम्हांला बाटविण्याचा हा इंग्रजी डाव आहे.

सुरुंगाच्या वातीवर आगीची ठिगणी पडावी 'तसा त्या काडतुसांच्या कहाणीचा परिणाम झाला नसता तरच नवल !

### स्वा ध्या य

१. इंग्रजी अंमल हा आपल्या धर्मावर घाला आहे, असें हिंदु आणि मुसलमान ह्यांना कां वाटूं लागलें ?
२. इंग्रजांचा भारतांतील धर्मावरील घाला योजनाबद्ध कसा होता, ह्याचें उदाहरणें देऊन स्पष्टीकरण करा.
३. इंग्रजांपूर्वी भारतावर ख्रिस्ती धर्माची सावट कां व कशी पडली होती ?
४. मॅंग्लेजच्या शब्दांत इंग्रजांचा भारतावर आक्रमण करून भारत लाटण्याबाबतचा ख्रिस्ती कावा स्पष्ट करा.
५. इंग्रजी शिक्षण देण्यासाठीं भारतांत बंगालमध्यें अगदीं पहिली शाळा उघडतांना मेकॉलेनें काय इच्छा प्रदर्शित केली होती ?
६. तेव्हांचें मिशनरी अंतरंग उघड करून दाखवा.
७. धर्मांतरितांच्या पूर्वधर्मातील राहाणीच्या वेळच्या मालमत्तेबाबत इंग्रज-सरकारनें कोणता कायदा केला ? त्या कायद्याचा 'हिंदु धर्मावर घाला' असा अर्थ हिंदी जनतेनें कां घेतला ?
८. इंग्रजांच्या ख्रिस्ती धर्मविषयक धोरणाचा हिंदी लष्करावर काय परिणाम झाला ?





प्रकरण सातवें

## क्रांतियज्ञाची सिद्धता



सुरुंगाच्या वातीवर जी ठिणगी पडली ती चरबी चोपडलेल्या नव्या काडतुसांची खरी. पण सुरुंगच कोरड्या दारूनें चांगले ठांसून भरून पेरून ठेवलेले नसते, तर त्या ठिणगीनें क्रांतीचा प्रचंड वणवा भडकला नसता.

ह्या ना त्या निमित्तानें हिंदी लष्करी शिपायांच्या असंतोषावर ठिणगी पडण्याचा कंपनीसरकारच्या राजवटींतील हाच कांहीं पहिला प्रसंग नव्हता. पूर्वी सन १८०६ सालीं वेलोरला असाच शिपायांच्या बंडाचा वणवा पेटला आणि थोडा धुमसत धुमसत विझून गेला.

त्यानंतर सन १८२२ सालीं अर्काटच्या लष्करी छावणींत असाच बंडाचा भडका उडण्याच्या अगदीं बेताला आला होता. तो भडका तेव्हां

उडाला नाहीं. परंतु शिपायांच्या मनांत तेव्हांही किती तीव्र असंतोष धुमसत होता, ह्याचा तेव्हांच्या पुढील एका पत्रावरून अंदाज करतां येण्याजोगा आहे.

'.... मुसलमानांनीं इंग्रजांसाठीं अनेक प्रकारची गुलामगिरी स्वीकारली. त्यामुळें त्यांची प्रार्थना अल्लाच्या घरीं रुजू होऊं शकत नाहीं. मुसलमानांच्या गुलामी वृत्तीमुळें अल्लाचा त्यांच्यावर कोप झाला असून त्यापायीं शेंकडों लोक पटकीनें मरत आहेत. ह्या वेळीं सर्वांनीं आपल्या धर्माच्या रक्षणासाठीं प्राणांवर उदार होऊन प्रयत्न केला पाहिजे. दिल्ली-अर्काटमध्यें हजारों लाखों हिंदु-मुसलमान बांधव आहेत. तेथल्या इंग्रजांची संख्या त्यांना खिजगणतींतही' घेण्याचें कारण नाहीं. सर्वांनीं मिळून एकजुटीनें प्रयत्न केल्यास मूठभर इंग्रज चुटकीसरसे खलास केले जातील. ह्या देशांतील सर्व जहागीरदारांच्या आणि जमीनदारांच्या जमिनी हिसकावून घेतल्या आहेत. सहा महिन्यांच्या आंतच विलायतेहून नवी इंग्रज फौज येणार आहे. ती फौज आली कीं देशी शिपायांचीं हत्यारें काढून घेण्यांत येतील, आणि त्यांना बडतर्फी मिळेल. ह्यामुळें सर्व सुभेदार–जमादार–दफेदारांनीं आपसांत सल्लामसलत करून ठरल्या दिवशीं इषारा मिळतांच बंड करावें. निवडक दहा देशी शिपायांनीं इंग्रज अधिकाऱ्याच्या बंगल्यावर जाऊन त्याला तेथल्या तेथें ठार करावें. एवढी बहादुरी जे गाजवितील, त्या सुभेदार लोकांना कर्नलची बढती मिळेल. शिपायांनाही वरच्या अधिकाराच्या जागा देण्यांत येतील.'

त्यानंतर थोड्याच दिवसांनीं मद्रासचा गव्हर्नर सर टॉमस मन्रो ह्याला असेंच एक चमत्कारिक पत्र आलें. त्यांत लिहिलें होतें, 'सर्व मानमरातब आणि पैसा फक्त गोऱ्या शिपायांना मिळतो. हिंदी शिपाई फक्त श्रम आणि संकटें भोगण्याचे धनी. हिंदी फौजेनें पराक्रम करून तरवारीच्या जोरावर मुलुख जिंकावा आणि पोटभरू गोऱ्या लोकांनीं त्या मुलुखावर राज्य करावें, श्रम न करतां आयतें श्रीमंत व्हावें, अशी स्थिति आली आहे.

हिंदी शिपायांनीं जन्मभर नोकरी केली तरी त्यांचा पगार पांच रुपयांवर वाढत नाहीं. मुसलमानी अंमलांत अशी गत नव्हती. फौजेनें एखादा मुलुख जिंकून घेतला कीं बहादुर शिपायांना जमिनीचीं वतनें मिळत. विशेष पराक्रम गाजविणाऱ्या सुभेदारांना जहागिरी मिळत. मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळत. कंपनीच्या राज्यांत मात्र फक्त गोऱ्या लोकांनाच काय तें इनाम, बक्षिसें व बढत्या मिळतात. '

दोन वर्षांनंतर सन १८२४ सालीं बराकपूर येथें असाच शिपायांचा असंतोष भडकण्याचा प्रसंग आला होता. कंपनीसरकारनें ब्रह्मदेशाशीं युद्ध मांडलें, तेव्हां तिकडे देशी फौज पाठविण्याची वेळ आली. ब्रह्मदेश म्हणजे परदेश. हिंदुधर्मांत परदेशगमन निषिद्ध मानलेलें. हिंदी शिपाई धर्मनिष्ठ. ब्रह्मदेशांत जाऊन धर्मविरुद्ध आचरण करायला ते कबूल होईनात. त्यांनीं बंड केलें. तें इंग्रजांनीं आपल्या तोफखान्याच्या जोरावर मोडून काढलें. पण त्यामुळें हिंदी शिपायांचा इंग्रजांवरील विश्वास उडाला. त्यांच्या अंतःकरणांत असंतोष धुमसत राहिला.

असें शिपायांच्या अंतरींचें दुःख सांचत सांचत त्याचा स्फोट व्हायला १८५७ साल उजाडायचें होतें. नव्या काडतुसांनीं तो स्फोट व्हावा, असा योगायोग होता. आणि तो योगायोग जमून आला, अगोदर सुरुंग ठांसून भरून पेरून ठेवले होते म्हणून.

हे सुरुंग पेरण्याचें काम नानासाहेब, अजिमुल्लाखान, झांशीची राणी, फैजाबादचा मौलवी अहंमदशहा अशा क्रांतिझुंझारांनीं अतिशय गुप्तपणें पण अतिशय नेटानें चालविलें होतें.

अजिमुल्लाखान नानासाहेबांना न्याय मिळविण्यासाठीं विलायतेला गेला, तो न्याय म्हणून अन्यायाचें जड गांठोडें शिरावर घेऊन माघारा आला. तो विलायतेंतून येतांना रशिया, ईजिप्त, वगैरे परदेशांत भारताच्या आगामी स्वातंत्र्याच्या लढ्यासाठीं सहानुभूति व साह्य मिळतें का पाहाण्यासाठीं प्रवास करून आला. भारतांत येण्यापूर्वींच नानासाहेबांना आपल्या बाबतींतील

विलायतसरकारचा म्हणजे कंपनीच्या संचालक मंडळाचा प्रतिकूल निर्णय कळला होता. आतां क्रांतियुद्ध करून भारतांतून इंग्रजांना पिटाळून घालवून देणें आणि भारत स्वतंत्र करणें, ह्यापेक्षां दुसरा मार्ग नाहीं, अशी त्यांची पुरेपूर खात्री झाली होती. त्या धोरणानें त्यांनीं ब्रह्मावर्ताहून भारतांतील समदु:खी राजेरजवाड्यांवर गुप्त पत्रें पाठवून आगामी क्रांतियुद्धासाठीं गुपचुप मोर्चे बांधायलाही सुरुवात केली होती. ब्रह्मावर्ताच्या जोडीला दिल्ली, लखनौ, सातारा असे समदु:खी राजे क्रांतियुद्धाला मनांतून राजी असल्यावर त्या कार्यासाठीं पैशाची वाण भासण्याचें कारणच नव्हतें.

हे नुसते राजेरजवाडेच गुप्त क्रांतिकार्याची धुरा वाहात होते असें नाहीं. धर्मनिष्ठ हिंदु-मुसलमानांना तेव्हां साधुसंत आणि फकीरअवलिये ह्यांच्याविषयीं फार आदर वाटे. असे हजारों साधु संन्यासी, फकीरअवलिये इंग्रजांविरुद्ध धर्मयुद्ध करा आणि भारत स्वतंत्र करा असा उपदेश करीत देशभर क्षेत्रोक्षेत्रीं, गांवोगांवीं संचार करूं लागले.

त्या वेळीं प्रत्येक लष्करी तुकड्यांबरोबर मुल्ला मौलवी पंडित लोक शिपायांना धर्ममार्गानें जातांना मार्गदर्शन करण्यासाठीं असत. हें निमित्त घेऊन हजारों क्रांतिकारक मुल्ला मौलवी पंडित बनून धर्मोपदेशाची पताका हातीं घेऊन लष्करांत शिरत. तेथें दिवसा धर्मोपदेश आणि रात्र पडली, शांतसा एकान्ताचा वेळ मिळाला कीं सशस्त्र क्रांतीच्या उठावाची पद्धतशीर शिकवण, असें मारुतीच्या पेटत्या शेपटानें खेडोपाडींदेखील जनमनांत लंकेला गुपचुप आग लावण्याचें कार्य जोरांत सुरू झालें.

मोठमोठ्या शहरांतून क्रांतिकारक वक्त्यांचीं क्रांतियज्ञाचें होमकुंड पेटविणारीं परिणामकारक प्रवचनें, भाषणें, कथाकीर्तनें देवळांदेवळांमधून, मशिदींमशिदींतून, दरएक यात्रा उरुसाची संधि साधून सुरू झालीं. तसेच तमाशे, पोवाडे, नाटकें, वगैरे लोकरंजनाचा कांहींही कार्यक्रम झाला तरी त्यांत लोकांना जागृत करणारी क्रांतीची पद्धतशीर शिकवण दिली जाऊं लागली.

ह्याप्रमाणें भारतांत हजारों लाखों खेडोपाडींदेखीलही इंग्रजी राजवटीच्या नाशासाठीं होऊं घातलेल्या सशस्त्र क्रांतीची — स्वातंत्र्ययुद्धाची शिकवण उघड्या डोळ्यांना न दिसणाऱ्या झंझावातासारखी पसरूं लागली. भारत खडबडून जागा होऊन स्वातंत्र्ययुद्धाची तयारी करूं लागला.

प्रांतोप्रांतीं, शहरोशहरीं हें इंग्रजी राजवटीचें लंकादहन शिस्तवार पार पाडतां यावें ह्यासाठीं क्रांतिकारकांच्या गुप्त कार्यकारी समित्या स्थापन झाल्या. त्या समित्यांमार्फत क्रांतीच्या योजनाबद्ध उभारणीची तयारी ह्या कानाची त्या कानाला दाद न देतां सुरू झाली.

असें क्रांतीचें जाळें भारतभर, विशेषतः उत्तर भारतभर विणलें गेलें आणि नानासाहेब पेशवे, अजिमुल्लाखान, फैजाबादचा मौलवी अहंमदशहा, ह्यांच्या यात्रा सुरू झाल्या. हिंदु-मुसलमान भाई भाई हातांत हात घालून खेळीमेळीनें यात्रा करायला निघाले. ही क्रांतिकारक पुढारी मंडळी संगनमतानें कोणत्या यात्रेला निघाली होती, हें कोणीं कोणाला विचारण्याची किंवा सांगण्याची कांहींच गरज नव्हती.

जशी हिंदूंची काशी-वाराणशी, किंवा जसें मुसलमानांचें मक्का, अथवा जसें शिखांचें अमृतसर, तसें साऱ्या हिंदु-मुसलमान क्रांतिकारकांचें परमश्रेष्ठ क्रांतितीर्थ भारताची राजधानी दिल्ली. नानासाहेब आणि त्यांची सहकारी क्रांतिकारक पुढारी मंडळी ह्यांनीं प्रथम दिल्ली, त्यामागोमाग अंबाला, लखनौ, काल्पी, अशा प्रमुख मोक्याच्या लष्करी ठाण्यांना भेटी देऊन क्रांतीची देशव्यापी योजना तारीख वार वेळेसह नक्की केली. झांशीची राणी, बिहारचा रणगाजी वृद्ध राणा कुमारसिंह, सारी-सारी प्रमुख मंडळी आपापल्या नियोजित क्षेत्रांत क्रांतियशाची अशीच गुप्तपणें जय्यत तयारी करीत होती.

अशी सारी तयारी झाली आणि तारीख ३१ मे, १८५७ हा भारतभर स्वातंत्र्यासाठीं क्रांतियज्ञाचीं होमकुंडें चेतविण्याचा मुहूर्त ठरला.

परंतु इंग्रजी राजवटीला सर्वस्वी विटलेल्या क्रांतिकारक हिंदी शिपायांचा मर्दानी उत्साह एवढा दांडगा होता कीं ३१ मेपावेतों तरी ते दम धरतील अशी खात्री वाटेना. कारण सुरुंगाच्या वातीवर नव्या काडतुसाची ठिणगी पडली होती. ती वात पेटत होती. सुरुंग केव्हां उडेल ह्याचा भरंवसा नव्हता.

## स्वा ध्या य

१. हिंदी लष्करांत इंग्रजी सत्तेविषयीं केव्हां केव्हां, कसा व कां असंतोष भडकला होता तें सांगा.

२. १८५७ सालीं काडतुसांनीं कोणत्या सुरुंगांचा स्फोट झाला ? ते सुरुंग कोणीं कसे पेरून ठेवले होते ?

३. नानासाहेब पेशव्यांच्या गाऱ्हाण्याची विलायतेंत कशी वासलात लागली ?

४. नानासाहेब पेशव्यांनीं आगामी क्रांतियुद्धासाठीं मोर्चे बांधण्याची कशी गुप्त तयारी चालविली होती ?

६. लष्करांत प्रचार करण्यासाठीं कोणती युक्ति सफल झाली ?

७. हिंदु-मुसलमान भाईभाई यात्रा करायला हातांत हात घालून निघाले. त्या यात्रांच्या मुळाशीं असलेले हेतु स्पष्ट करा.

८. क्रांतियज्ञाचीं होमकुंडें चेतविण्याचा मुहूर्त कोणता ठरला ?





प्रकरण आठवें

# ‘ मंगल पांडे की जय ! ’



कलकत्त्याच्या दमदम दारूगोळा कारखान्यांत तयार करण्यांत आलेल्या नव्या काडतुसांचा प्रयोग जवळच्याच बराकपूर ठाण्यावरील एकोणिसाव्या लष्करी सैन्य तुकडीवर करावा असें ठरलें. ही फेब्रुवारी १८५७ मधील गोष्ट.

त्यापूर्वीच सुरुंगाची वात ठिणगी पडून धुमसूं लागली होती. आगामी क्रांतियज्ञाचा संदेश बराकपुरांतही दरएक शिपायाच्या कानामनांत घुमूं लागला होता. बराकपूरला दोन हिंदी लष्करी सैन्यतुकड्या होत्या. दोन्ही तुकड्यांतील शिपाई अगोदरच नव्या काडतुसांची ओंगळ बातमी बनावटीची कहाणी ऐकून चिडले होते. अशा स्थितींत नव्या काडतुसांचा प्रयोग करून पाहाण्याची तारीख उजाडली.

" आज हीं नवीं काडतुसें वापरून बंदुका उडवा." असा शिपायांना परेडीच्या मैदानावर लष्करी अधिकाऱ्याचा हुकूम झाला.

शिपायांनीं निर्धारानें सांगितलें, " नाहीं वापरणार. "

कां नाहीं वापरणार, हें नव्यानें सांगण्याची आवश्यकताच नव्हती. काडतुसांच्या बाबतींत शिपायांत कोणता वारा वाहातो आहे ह्याची त्या अधिकाऱ्यांना कल्पना होतीच.

लगेच ती उद्धट एकोणिसावी लष्करी तुकडी निःशस्त्र करून मोडून टाकण्याचा हुकूम सुटला.

पण बराकपूरचे शिपाई आतां केवळ ' जो हुकूम 'वाले आज्ञाधारक होयबा उरले नव्हते. त्यांनीं बंदुका तर खालीं ठेवल्या नाहींतच. पण वरिष्ठांचा प्रत्येक हुकूम धुडकावण्याचें उग्र धोरण त्यांनीं आरंभिलें.

इंग्रज वरिष्ठांनीं काळवेळ ओळखून मुकाटपणें तो अपमान गिळला. त्या दिवशीं ते शिपायांच्या अधिक वाटेला गेले नाहींत. कारण तेव्हां साऱ्या प्रांतांत कुठेंही गोरें सैन्य शिल्लक नव्हतें. सारे गोरे ब्रह्मदेशाच्या लढाईवर रवाना झाले होते.

लगेच मार्च महिन्याच्या आरंभीं बराकपूरच्या हिंदी सैनिकांना निःशस्त्र करून त्या पलटणी मोडून टाकण्यासाठीं ब्रह्मदेशांतून गोरी पलटण कलकत्त्याला बोलावण्यांत आली.

शिपायांना ह्या साऱ्या हालचाली समजत होत्या. ते शिपाई असला अपमान निमूटपणें सहन करायला तयार नव्हते. उठावाची ३१ मे उजाडायला अजून अवकाश होता. तोंवरही लष्करांत नोकरी करणें त्या शिपायांना मोठें अपमानकारक वाटूं लागलें. त्यापेक्षां नोकरी सोडून घरीं जाण्याच्या गोष्टी ते बोलूं लागले. त्यांना त्यांचे पुढारी बाबापुता करून सांगत होते, " एकदम असा अविचार करूं नका. आपण आपल्या साऱ्या जाणत्या मंडळीचें मत घेऊन मग काय तें करूं."

परंतु इतका धीर त्या शिपायांना निघेना. निरनिराळ्या ठाण्यांवर क्रांतिसमित्यांच्या उठावाचा दिवस लौकरच नक्की करण्यासाठीं तांतडीनें पत्रेंही रवाना झालीं. पण त्या पत्रांचीं उत्तरें येऊन सर्वांच्या विचारें योजना ठरण्याइतकीही फुरसत मिळणें मुष्किलीचें झालें. इतके इंग्रजांवर चिडलेले बराकपूरचे शिपाई अगदीं अनावर झाले होते. त्या खवळलेल्या शिपायांनाही त्यांचे पुढारी कसेबसे आवरीत होते. पण मंगल पांडे हा तरुण ब्राह्मण शिपाई त्यांना कांहीं केल्या आवरेनाच. त्यानें जी तरवार म्यानाबाहेर काढली, ती पुन्हा म्यान करायला तो कांहीं केल्या तयार होईना. गायी-डुकराची चरबी चोपडलेलीं काडतुसें दांतांनीं तोडायला लावून हे दुष्ट इंग्रज आपणाला बाटवायला निघाले आहेत ह्या भयंकर कल्पनेनें त्याचें मस्तक अगदीं सुन्न होऊन गेलें होतें. त्याला स्वतःच्या जिवाहूनही स्वतःचा धर्म प्यार होता.

अशा परिस्थितींत तारीख २९ मार्च उजाडली. सर्व शिपाई परेडीच्या मैदानावर गेले. तोंच मंगल पांडे मूर्तिमंत क्रांतिदेवता अंगांत संचारल्यासारखा खवळून तरवार परजीत एकदम मैदानांतून निघाला. जातां जातां तो आपल्या शिपाई बांधवांना देवा-धर्माची शपथ घालून दगलबाज इंग्रजांविरुद्ध स्वातंत्र्यसंगरांत उडी घेण्यासाठीं कळवळून आव्हान करीत सुटला.

" मंगल पांड्याला पकडा. " त्या तुकडीच्या सार्जंट मेजरनें शिपायांना हुकूम सोडला.

पण एकही शिपाई जागचा हलेना. सार्जंट मेजरचा हुकूम कोणी मानीना. उलट त्याच्या मुखांतून तो आवाज वातावरणांत विरून जातो न जातो तोंच मंगल पांड्याच्या बंदुकींतून गोळी सूं सूं करीत निघाली, ती त्या सार्जंट मेजरच्या छातींत आरपार घुसली. त्या गोळीसरसा साहेबाचा जिवंत मुडदा खालीं कोसळला.

सार्जंट मेजरवर ओढवलेला हा प्रसंग पाहून त्याचा सहकारी गोरा लेफ्टनंट घोडा दौडीत बहिरी ससाण्यासारखा पांड्याच्या रोखानें चालून

आला. पांडे त्याला उडविण्यासाठीं बंदूक भरूं लागला. तेवढ्यांत त्या लेफ्टनंटनें जवळ येतां येतां आपल्या पिस्तुलाला हात घातला. तेवढ्यांत पांड्याच्या हातांतील बंदुकीची गोळी सुटली. गोळी गोऱ्या स्वाराच्या घोड्याला लागून घोडा खालीं कोसळला, तसा घोड्याच्या पाठीवरचा स्वारही खालीं कोसळला.

स्वारानें पडतां पडतां तोल सांवरून पांड्यावर नेम धरून पिस्तुल रोखलें. पुन्हा बंदूक भरण्याइतका वेळ पांड्याला मिळाला नाहीं. तरीही त्यानें बंदुक डाव्या हातांत सांवरीत उजव्या हातानें तरवार उपसली. तोंच स्वाराच्या हातांतील पिस्तुल उडालें. पण नेम चुकला. उलट पांड्याच्या तरवारीनें मात्र अचूक नेम साधला. स्वारानें आपली तरवार उपसली न उपसली, तोंच पांड्याच्या तरवारीचा मरणघाव त्याच्या अगदीं जिव्हारीं जाऊन झोंबला आणि मुडदा धाडकन खालीं कोसळला.

तिसरा एक गोरा सोजीर तेवढ्यांत पांड्याला ठार करायला धावून आला. परंतु त्याची गोळी पांड्यावर सुटण्यापूर्वीच जवळच्या एका हिंदी शिपायाच्या हातांतील बंदुकीच्या दस्त्याचा घाव ताडकन त्याच्या माथ्यावर पडला. त्याबरोबरच साऱ्या हिंदी शिपायांच्या मुखांतून इषारा गरजला, " खबरदार पांड्याच्या केसाला तरी धक्का लावाल तर. "

कर्नल व्हीलर तेवढ्यांत ह्या अनर्थाची वार्ता ऐकतांक्षणीं धावून आला. त्यानें शिपायांना करडा हुकूम सोडला, " पांड्याला पकडा. "

तितक्याच करड्या सुरांत सर्व शिपायांकडून व्हीलरला एकमुखी उत्तर मिळालें, " आम्ही ह्या पवित्र ब्राह्मणाच्या केसालाही धक्का लावणार नाहीं. "

समोरच दोघा गोऱ्यांचीं प्रेतें रक्ताच्या थारोळ्यांत लोळत पडलीं होतीं. तीच आपलीही दशा होईल ह्या भयानें व्हीलर मुकाटपणें आपल्या बंगल्याकडे चालता झाला.

मंगल पांडे मूर्तिमंत प्रळयदेवतेसारखा आपल्या शिपाई बांधवांना स्वातंत्र्ययुद्धांत एकदम उडी घेण्याला सांगत होता. तो आवेशानें कळवळून टाहो फोडीत परेड मैदानावरून चालला होता.

तोंच सशस्त्र गोऱ्या शिपायांनीं त्याला चोहींकडून घेरलें. नीच फिरंग्यांच्या हातून अपमान सोसून मरण्यापेक्षां स्वतःच्याच हातानें स्वतःचा शेवट करणें त्याला योग्य वाटलें. त्यानें स्वतःच स्वतःवर बंदूक झाडली. योगायोग असा कीं तो भयंकर जखमी होऊन खालीं पडला, पण ठार झाला नाहीं. त्याला गोऱ्या शिपायांनीं उचलून इस्पितळांत नेलें.

कांहीं दिवसांनीं पांडे बरा झाला. नंतर त्याची कसून लष्करी चौकशी सुरू झाली.

"तूं जर तुझ्या माहितींतील इतर कटवाल्यांचीं नांवें सांगशील, तर तुला जीवदान मिळेल." असें माफीचें आमिष त्याला दाखविण्यांत आलें.

परंतु त्या बहाद्दराच्या तोंडून एक तरी नांव फुटेल तर शपथ !

नंतर पांड्यावर लष्करी कोर्टांत लष्करी पद्धतीनें खटला भरण्यांत आला. खटल्याला अधिक साक्षीपुराव्याची गरजच नव्हती. सारा अगदीं उघडा कारभार होता.

लष्करी कोर्टापुढें पांड्यानें आपलें अंतःकरण उघडें करून सांगितलें, "मीं ज्या अधिकाऱ्यांना ठार केलें, त्यांच्याविषयीं माझ्या मनांत कांहींही व्यक्तिविषयक हेवादावा नव्हता. पण माझ्या देवाधर्मावर घाला घालणाऱ्या इंग्रजी सत्तेचे ते अधिकारी प्रतीक होते. म्हणून मीं माझ्या सदसद्विवेक-बुद्धीला स्मरून अपराधी इंग्रजी शासनसंस्थेला शासन केलें."

पांड्याला फांशीची शिक्षा सुनावली गेली. ती त्यानें शांतपणानें हसत-मुखानें ऐकली.

तारीख आठ एप्रिल हा दिवस पांड्याला फांशीं देण्यासाठीं मुक्रर करण्यांत आला. परंतु तो दिवस जवळ येऊं लागला तरी फांशीं देणाऱ्या मारेकऱ्याचें काम करायला उभ्या बराकपुरांत एकही माणूस तयार होईना.

अखेर कलकत्त्याहून हें अमंगळ कृत्य करण्यासाठीं फांशीपंडित मुद्दाम आणविण्यांत आला.

ठरल्याप्रमाणें आठवी तारीख उजाडली. त्या दिवशीं सकाळीं पांड्याला गोऱ्या सोजिरांच्या कडेकोट पाहाऱ्यांत फांशीच्या खांबाकडे नेण्यांत आलें. शिपायांच्या दुतर्फा रांगांतून तो धिमेपणानें फांसाकडे चालत गेला. शिडीवरून फांसाच्या फलाटावर चढला.

ह्या क्षणीं तरी दहशत वाटून त्यानें कबूल करावें, म्हणून तें विचारतां विचारतांच त्याच्या मानेवर फांस टाकण्यांत आला. असें फांसांत पकडून तेथें उपस्थित असलेल्या वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यानें त्याला शेवटचें विचारलें, " कटवाल्यांचीं नांवें आतां तरी सांगतोस का ? "

पांडे निर्भयपणें उत्तरला, " नाहीं. "

तो अखेरचा शब्द त्याच्या मुखावाटे निघतो न निघतो, तोंच त्याच्या पायांखालचें फलाट खालीं मिटलें गेलें. पांडे फांसावर लटकला.

पांडे फांशीं गेल्याची बातमी त्याच्या बहाद्दर साथी शिपायांनीं दुःखी अंतःकरणानें ऐकली. पण त्या दुःखानें त्यांचें मन खचलें नाहीं. खंबीर मनानें ते आपापसांत उद्गारले, " पहिलें दान देवाला. मंगल पांडे की जय ! "

### स्वाध्याय

१. नव्या काडतुसांचा प्रयोग बराकपूरच्या लष्करावर करून पाहातांना अधिकाऱ्यांना काय अनुभव आला ? परिणाम काय झाला ?
२. तारीख २९ मार्च १८५७ ह्या दिवसाचें महत्त्व वर्णन करा.
३. मंगल पांडे ह्याला कसें पकडलें ? त्याचा न्याय कसा करण्यांत आला ? त्याला माफी देऊं करण्यांत आली ती त्यानें कां स्वीकारली नाहीं ?
४. मंगल पांडे ह्यानें लष्करी कोर्टापुढें आपलें अंतःकरण कसें उघडें केलें ?
५. अखेरच्या क्षणीं पांड्याला वश करण्याचा कसा प्रयत्न झाला ?
६. 'पहिलें दान देवाला. मंगल पांडे की जय !' ह्या शिपायांच्या उद्गारांचा अर्थ स्पष्ट करा.





प्रकरण नववें

# मीरतचें हत्याकांड



मंगल पांड्याच्या बलिदानाची बातमी भारतांतील दूरदूरच्या लष्करी ठाण्यांवर झंझावातासारखी पसरली. कोठे कलकत्ता–बराकपूर आणि कोठें पंजाबांतील अंबाला. पण बराकपूरला पेटलेल्या रणकुंडाच्या ज्वाळा अंबाला लष्करी ठाण्याला अगदीं थोड्या दिवसांत जाऊन भिडल्या. उठावाची तारीख ३१ मे अजून दूर होती. त्यापूर्वीच बराकपूरला मंगल पांड्याच्या आत्मयज्ञांतून क्रांतीच्या ज्वाला अकस्मात भडकूं लागल्या. तेव्हां अनेकांना आतां पुढें काय होणार अशी चिंता वाटणें स्वाभाविक होतें. पुरत्या तयारीखेरीज उठाव करणें म्हणजे पतंगानें पेटत्या दिव्यावर झडप घालण्यासारखें होय, हें शिपायांना कळत होतें. परंतु तें कळूनदेखील अंबाला येथील शिपायांचा संताप मंगल पांड्याची आहुति क्रांतियज्ञांत

पडलेली पाहून भडकला. अनावर झाला. त्याचा ताबडतोब झालेला पहिला परिणाम म्हणजे गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांच्या बंगल्यांना लागत सुटलेल्या आगी. जें अंबाल्यांत तेंच इतर ठिकाणींही. लष्करी अधिकाऱ्यांनीं ह्या आगी कोण लावतें ह्याचा तलास लावण्यासाठीं प्रयत्नांची शिकस्त केली. पण तलास कांहीं अखेरपावेतों लागला नाहीं.

ती आग धुमसत धुमसत मीरतला जाऊन भिडली. तेथील गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांना आपल्या ठाण्यावरील हिंदी शिपायांच्या राजनिष्ठेची कसोटी पाहावीशी वाटली. राजनिष्ठेचें गमक म्हणजे नवीं काडतुसें. मीरतला असलेल्या घोडेस्वारांच्या पथकांत नव्वद हिंदी स्वार होते. तारीख १० मे रोजीं त्यांना नवीं काडतुसें वापरण्याचा हुकूम सुटला.

पण ते स्वार कांहीं तो हुकूम पाळीनात. नव्वदांपैकीं अवघे पांच असामी हुकूम पाळणारे निघाले. बाकीचे पंचायशीं त्या काडतुसांना स्पर्शही करायला तयार होईनात.

"हीं काडतुसें तुम्हीं वापरलीं पाहिजेत." वरिष्ठ अधिकाऱ्याचा त्या पंचायशींना पुन्हा करडा हुकूम सुटला. पण तो हुकूम म्हणजे तोंडची वाफ ठरली. एकतरी शिपाई त्या हुकुमाला धूप घालील तर शपथ! सारेजण त्या काडतुसांकडे ढुंकूनही न पाहातां बेधडक आपल्या छावणींत माघारे चालते झाले.

लष्करी अधिकाऱ्यांना हिंदी शिपायांचा हा उद्धटपणा सहन झाला नाहीं. लष्करी शिस्तीला तो सर्व प्रकारें मारक होता. लगेच लष्करी कोर्टापुढें त्या पंचायशीं शिपायांवर खटले भरण्यांत आले. सर्वांना आठ ते दहा वर्षांच्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या.

मीरतमधील बाकीच्या हिंदी शिपायांना आपल्या शिपाईभाईंची इंग्रज सरकारकडून झालेली ही मानखंडना सहन होईना. ते त्या दिवशीं सकाळपासून संतापानें अगदीं सैरभैर झाले होते. 'काय करावें? हा अपमान मुकाटपणें कसा गिळावा? असला जुलूम सहन करायला आम्ही काय

भित्र्या भागूबाई आहों ?' असें जो तो आपापल्या बराकींत निमूटपणें माघारा जातांना स्वतःच्या मानी मनाला विचारीत होता. मंगल पांड्याचें माणसाला चिरंजीव करणारें हुतात्म्याचें मरण मूर्तिमंत त्यांच्या नजरेपुढें होतें.

मंगल पांड्यासारखें देशाच्या, देवाधर्माच्या रक्षणासाठीं शस्त्र उचलून मारतां मारतां चिरंजीव व्हावें, कीं नेभळें भागूबाई जिणें होईल ती विटंबना सहन करीत जगावें ? प्रश्न पडला होता.

असें विचारांचें काहूर डोक्यांत माजलें असतांना ते शिपाई माघारे आपापल्या बराकींत आले. ते येण्यापूर्वीच परेड मैदानावर घडलेल्या प्रकाराचे पडसाद बराकींत शिपायांच्या बायकामुलांच्या मनांत उमटूं लागले होते.

आपले मर्द खिन्न मनानें मुकाटपणें परेड मैदानावरून माघारे आलेले पाहातांक्षणीं त्या शूरांच्या बायका त्यांना विचारूं लागल्या, " हें काय ? तुमचे भाई तिकडे तुरुंगांत खितपत पडत आहेत आणि तुम्ही असे घरांत चुलीपाशीं माशा मारीत बसणार ? अशानें तुम्हांला नामर्द म्हणून सारे तुमच्या नांवावर थुंकतील कीं ! "

बाजारांत जावें, तरी तेथेंही बायकामुलांनीं, शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं, खेडुतांनीं तेंच विचारावें.

त्या रात्रीं शिपायाशिपायांत काय तीं खलबतें झालीं आणि उजाडत्या रविवारीं सूर्याला गोंडा फुटण्यापूर्वीं दिल्लीला जासूद निरोप घेऊन रवाना झाला, " एकदोन दिवसांत दिल्लीकडे येत आहों. तयारी ठेवा. "

तयारी कसली ? तर पूर्वयोजनेनुसार परंतु ताबडतोब दिल्लीच्या बादशाहाला अभिवादन करून त्याच्या हुकुमानें दिल्लीवर राज्यक्रांतीचा ध्वज उभारण्याची.

रविवार उजाडला. जासूद दिल्लीला रवाना झाला. सारे हिंदी शिपाई रात्रीं ठरलेल्या संकल्पाला मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगाला लागले.

रविवार हा ख्रिस्ती लोकांचा प्रार्थनेचा दिवस. शिपायांच्या अंतरंगांत कसा ज्वालामुखी धुमसतो आहे, ह्याची गोऱ्यांना कल्पनाही नव्हती.

पूर्वदिवशींचा शिपायांचा नेभळा शांतपणा पाहून साऱ्या इंग्रजांनीं आपल्या मतें शिपायांचें पाणी जोखलें होतें. तिकडे बराकपूरला कांहीं का होईना ! अंबाल्यांतला शिपायांचा अवखळपणा येथें मीरतच्या ठाण्यांत डोकें वर काढायला धजत नाहीं. हुकुमाची अमान्यता करणाऱ्या शिपायांना फार जबर शिक्षा ठोठावल्या, त्याचा हवा तो इष्ट परिणाम दिसून आला. आतां भ्यायचें कांहीं कारण नाहीं..... असे मनांत मांडे खात त्या दिवशीं सकाळीं सारे गोरे प्रार्थनामंदिरांत जाऊन प्रभूची प्रार्थना करीत बसले होते.

आणि त्या गोऱ्यांच्या नजरेआड मीरत शहरांत नागरिक स्वातंत्र्य-युद्धाचें रणशिंग फुंकण्याच्या गर्दींत होते. आजूबाजूच्या खेडोपाडींचे हजारों खेडुत नागरिकही खंद्या शिपाईबाण्यानें हातीं लागेल तें मोडकें तोडकें शस्त्र घेऊन त्या युद्धांत सामील होण्यासाठीं पहांटेपासूनच मीरतकडे धाव घेत होते.

तोंच प्रार्थनामंदिरांतील घंटा वाजूं लागली. गोरे पुरुष, बायका, मुलें भक्तिभावानें हात जोडून प्रभूची प्रार्थना करूं लागलीं. ती घंटा हाच मीरतमधील शूर शिपायांनीं हल्ल्याचा इषारा म्हणून मुक्रर केला होता. घंटानादासरशी प्रार्थनामंदिरांत प्रार्थना सुरू झाली; तशी त्या प्रार्थनेला बाहेरून क्रांतिकारकांच्या घनगर्जनेची साथ मिळाली.

"चलो ! मारो फिरंगी को !"

क्रांतीचें रणशिंग फुंकलें गेलें. प्रार्थनामंदिरावर चोहोंकडून एकदम हल्ला झाला. प्रार्थनेला आलेल्या गोऱ्यांपाशीं हत्यारें नव्हतीं. त्यामुळें त्यांना हल्ल्याला तोंड देतां येईना. एकही वाट बाहेर पळायला मोकळी नव्हती, त्यामुळें पळतां येईना. खवळलेल्या हिंदी जमावानें प्रार्थनामंदिरांत सर्रास हाणामारी सुरू केली.

तो अनर्थ ऐकून गोरे लष्करी अधिकारी धावून आले. कर्नल फिनिस घोडा फेकीत बंदोबस्त करायला आला. तो लगेच त्याच्या घोड्यासह कापला गेला. बाकीच्या अधिकाऱ्यांचीही तीच गत झाली.

जें प्रार्थनामंदिरांत झालें, त्याचीच भडकलेली आवृत्ति मीरत शहरांत झाली. सांपडला गोरा कीं कर ठार! मग तो पुरुष असो, कीं स्त्री असो, कीं मूल असो. सारा रविवार, सारी रात्र असा होम साऱ्या मीरतभर धडाड पेटत होता. बरें, बाहेरून गोरे मदत मागवितील तर तोही उपाय नव्हता. इकडे क्रांतीचें रणशिंग फुंकलें जातांक्षणीं तारायंत्राच्या तारा तोडून टाकण्यांत आल्या होत्या आणि आगगाडीच्या लोखंडी मार्गांवरही क्रांतिकारकांचे खडे पाहारे बसविण्यांत आले होते. त्यामुळें मीरतमधील गोऱ्यांना कोठेंही हूं कीं चूं करायला अवसर नव्हता.

संध्याकाळच्या आंत मीरतचा तुरुंगही फोडला गेला. काल जबर शिक्षा ठोठावलेले बहाद्दर शिपाई मोकळे झाले. तसेच तुरुंगांतले इतर लोकही मोकळे सुटले. त्यांत कांहीं गुंडही असतील. पण त्याला काय इलाज?

रात्र पडूं लागली, तसे शिपाई पूर्वयोजनेप्रमाणें दिल्लीच्या वाटेला लागले. पण म्हणून कांहीं मीरतमधील गोऱ्यांना जरादेखील उसंत कशी ती मिळाली नाहीं. शिपाई दिल्लीकडे चालले तरी मागें राहिलेली जागी झालेली रयत होतीच. इंग्रजी नांवरस मीरतमधून पुसून टाकण्याचें काम सुरूच होतें. लष्करांतील गोऱ्यांच्या बंगल्यांच्या होळ्या पेटत होत्या. दगडी बंगले होते, ते पेटवून पेटत नव्हते, म्हणून पाडून जमीनदोस्त करण्यांत येत होते.

क्रांतियज्ञांतून उफाळून आलेलें मीरतचें हत्याकांड अटळ खरें. परंतु तें विसर न पडण्याजोगें होतें.

## स्वाध्याय

१. मंगल पांडे ह्याच्या बलिदानानंतर 'आतां पुढें काय?' अशी चिंता क्रांतीच्या नेत्यांना वाटण्याचें कारण स्पष्ट करा.
२. अंबालावर मंगल पांडे ह्याच्या बलिदानाचा काय परिणाम झाला?
३. मीरतच्या हिंदी लष्करी शिपायांची राजनिष्ठा गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांनीं कशी पारखून पाहिली? त्यांना काय अनुभव आला?
४. मीरतच्या शिपायांना त्यांच्या बायकांनीं क्रांतियुद्धाला कसें प्रवृत्त केलें?
५. दिल्लींतील त्या रविवाराचें महत्त्व सांगून त्याचें वर्णन करा.



प्रकरण दहावें

# दिल्लीवर स्वातंत्र्यध्वज फडकला



मीरतपासून दिल्ली कांहीं फार दूर नाहीं. अवघे बत्तीस मैल. मीरतचे शिपाई क्रांतीचे पेटते पलिते हातीं घेऊन दिल्लीला जाऊन पोहोंचायला पुरा दोन दिवसांचाही अवधि लागला नाहीं. दिल्लीच्या क्रांतिसमितीला तर आगाऊ खबर मिळाली होतीच. किल्ल्यांतील गोऱ्या लष्कराला खबर मिळण्याची मात्र कांहींच सोय नव्हती. तरी शिपाई दिल्लीच्या वाटेनें दौडत येत आहेत ही बातमी दिल्लीचा गोरा लष्करी अधिकारी कर्नल रिप्ले ह्याला दुसऱ्या दिवशीं सरकारी बातमीदारांकडून मिळाली. परंतु तो क्रांतिकारकांना रोकण्याची योजना करतो आहे तोंच इकडे क्रांतिकारक यमुनेवरील नावांचा पूल ओलांडून दिल्लीच्या तटाला येऊन भिडलेदेखील.

" मीरतच्या शिपायांना अडवा. " कर्नलचा हिंदी शिपायांना हुकूम सुटला. परंतु शिपाई आधींपासूनच सावध. सारे समजून उमजून कानांत बोटें घालून बसलेले. ते जसे कांहीं आपण त्या गांवचेच नाहीं अशा अभिनयांत म्हणाले, " साहेब ! शिपाई कुठें आहेत ते दाखवा म्हणजे त्यांना अडवतों. "

साहेब आपले शिपाई बरोबर घेऊन मीरतचे शिपाई कोठें आहेत तें दाखवायला निघाला. तोंवर ते शिपाई दिल्ली राजधानीच्या काळजांत घर पोखरूं लागले होते.

शिपाई शिपाई भेटले. मुकाबला झाला. पण झाला तो कसा ? तर गंगा यमुनेला येऊन मिळाली. गंगा-यमुना संगम झाला. पाण्यांत पाणी मिसळून तीर्थरूप झालें. रिप्ले बाजूला उभा राहून भांबावल्यासारखा पाहात होता. मीरतचे क्रांतिकारक शिपाई आणि दिल्लीचे क्रांतिकारक शिपाई समोरा-समोर आले ते एकमेकांशीं लढून इंग्रजाला जय मिळवून देण्यासाठीं नाहीं. हातांत हात घालून इंग्रजांशीं क्रांतियुद्ध लढण्यासाठीं.

कर्नल रिप्ले संतापला. तो आपल्या फौजेला दमदाट्या देऊं लागला. एकाहून एक करडे हुकूम सोडीत सुटला. परंतु त्याच्याच एका शिपायाच्या बंदुकींतून सुटलेला गोळ्यांचा वेग त्याच्या हुकमाच्या वेगाहून जास्त होता. त्याचा हुकूम हिंदी शिपायांच्या कानांमनाला पटण्यापूर्वींच त्या गोळ्यांनीं कर्नलच्या काळजाचा तळठाव घेतला. कर्नल ठार होऊन खालीं पडला. मीरत–दिल्लीचे क्रांतिकारक शिपाई विजयी मुद्रेनें दिल्ली कबजांत घेत निघाले. दिल्लीचे हिंदु-मुसलमान नागरिकही त्यांना उत्साहानें साथ देऊं लागले. शहरांतील इंग्रजांच्या मोहल्यावर शिपायांची धाड गेली. दिसला गोरा कीं कापा. गोऱ्यांच्या बंगल्यांना आगी लावा. गोऱ्यांची धनदौलत काय सांपडेल ती लुटा. असा धूमधडाका दिल्लीभर बादशाहा बहादुरशहाच्या जयजयकारांत दिवसरात्र सुरू होता.

दिल्लींतून इंग्रजांचा असा फडशा करीत शिपाई बादशाहाच्या राजवाड्याच्या विस्तीर्ण पटांगणांत जमा झाले. बादशाहाच्या जयजयकारानें सारें वातावरण दुमदुमून जाऊं लागलें.

शिपायांचे पुढारी बादशाहाच्या भेटीला गेले. ते नम्रपणें त्याला कुर्निसात करून जोडल्या हातांनीं सांगूं लागले, " खाविंद, मीरतला इंग्रजी राजवटीला मूठमाती देऊन आम्ही दिल्लीला आपल्या पायांपाशीं आलों आहों."

तें ऐकून बादशाहाला तर आरंभीं अभाग्याच्या घरीं कामधेनु आल्यासारखें वाटलें.

" तुम्ही आलांत. परवरदिगार अल्ला तुमचें भलें करो. माझ्या देशाचें भलें करो. माझ्या आम हिंदु-मुसलमान रयतेचें भलें करो. पण सर्व बाजूंनीं कावेबाज इंग्रजांनीं मला दुबळा करून ठेवलें आहे रे ! माझ्या पायांपाशीं तुम्ही आलां. पण कोणत्या तोंडानें मी तुम्हांला आसरा देऊं ? माझ्यापाशीं खजिना नाहीं. मी तुम्हांला पगार देऊन पोसूं शकणार नाहीं. माझ्या दुबळ्या आसऱ्याचा तुम्हांला काय उपयोग होणार ? " बादशाहा दुःखानें म्हणाला. एवढ्या आम भारताचा तो बादशहा बादशाहांचाही बादशाहा. असे दीनवाणे पण खरे उद्गार काढण्याचें त्याच्या अगदीं जिवावर आलें. पण प्रसंगच तसा होता. त्याचा नाइलाज होता.

बादशाहानें शिपायांना धीर देण्याऐवजीं ते बादशाहाचे उद्गार ऐकून शिपाई त्याला धीर देऊं लागले, " खाविंद ! खजिन्याची फिकीर नको. इंग्रजांचे गडगंज खजिने भारतभर लुटून दौलतींच्या राशी आणून आम्ही आपल्या पायांपाशीं लोटूं. "

अडचण काय ती पैशाचीच होती. ती अशी दूर करायला आपले शिपाई स्वयंप्रेरणेनें राजी आहेत असें पाहातांच बादशहाला धीर आला. सद्गदित अंतःकरणानें परवरदिगार अल्लाचें स्मरण करून तो शिपायांच्या विनंतीला मान द्यायला तयार झाला. त्यानें बादशाहा ह्या नात्यानें क्रांतिकारकांचें पुढारीपण करण्याचें कबूल केलें.

बादशाहाची कबुली मिळतांच मीरत-दिल्लीच्या शूर शिपायांचा आनंद गगनांत सामावेनासा झाला. इंग्रजांच्या कंपनीसरकारनें बादशाहा नांवाला तेवढा शिल्लक ठेवून बाकी सारे बादशाही रीतिरिवाज, बादशाही दराराही समूळ नष्ट केला होता. एखाद्या दिवाभीताच्या जिण्याच्या मोलाचें लाजिरवाणें जिणें त्यांनीं बादशाहाच्या वांट्याला घातलें होतें. परंतु क्रांतिकारक शिपायांनीं त्या मरणप्राय बादशाही अंमलाला पुन्हा पूर्वीच्या वैभवांत सजवून उभारणी केली. दिल्लीच्या लाल किल्ल्यांत व साऱ्या राजधानी दिल्लीभर बादशाहाच्या नांवाची द्वाही फिरविण्यांत आली. त्याला तोफांची सलामी देण्यांत आली. लाल किल्ल्यावर फडकणारें इंग्रजांचें निशाण ओढून फाडून पायपुसण्याच्या मोलानें फेकून देण्यांत आलें आणि त्या जागीं राजधानी दिल्लीवर क्रांतिकारकांचा स्वराज्यध्वज डौलानें फडकूं लागला. त्या काळांत आपल्या भारतीय बादशाहाचा अंमल हें एका परीनें भारतीयांचें स्वराज्यच होतें.

दिल्लींत इंग्रजांची अवस्था मात्र दिवाभीताहूनही केविलवाणी झाली. किल्ल्यांत आणि दिल्ली राजधानींतही मूठभर इंग्रजांनीं मरतां मरतां क्रांतिकारकांच्या मरणघावांना तोंड देण्याची आपल्या परीनें शिकस्त केली. पण त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. लढायला गोरे शिपाई फारसे दिल्लींतही नव्हतेच. जे होते, ते निदान लष्कराचीं दारूगोळ्याचीं कोठारें तरी क्रांतिकारकांच्या हातीं पडूं नयेत ह्यासाठीं प्राणपणानें लढले. पण तेही लढतां लढतां मारले गेले आणि दारूगोळ्याचा सांठा अखेर क्रांतिकारकांच्या हातीं पडला.

राजधानी दिल्लीवर क्रांतिकारकांचा मोर्चा मेच्या अकरा तारखेला येऊन धडकला. तेव्हांपासून पांच दिवस दिल्लीच्या कोनाकोपऱ्यांत इंग्रजी गुलामगिरीची उचलबांगडी आणि भारतीय स्वातंत्र्याची पुन:प्रतिष्ठा अशा लोकविलक्षण घडामोडी रात्रंदिवस सुरू होत्या. ह्या घडामोडी फिरंग्यांच्या संहाराच्या पार्श्वभूमीवर ठळकपणें उठून दिसत होत्या. त्या कत्तलींतून

स्वतःचा बचाव करण्यासाठीं इंग्रजांनीं अनेक पळपुट्या युक्त्या योजिल्या. कांहींनीं आपलीं तोंडें काळीं करून जणूं काय हाकलून दिलेल्या हिंदी लोकांचीं सोंगें घेतलीं. कांहीं तसेच डोंगरदरडींतून रानावनांतून जीव घेऊन पळत सुटले. ते कोणी अपघातांत तर कोणी असह्य उष्णतेमुळें तडफडून मरण पावले, कांहीं भगवे संन्यासी बनून कबीराचे दोहरे गात एकतारी वाजवीत जीव बचावीत मीरतच्या वाटेला लागले. मीरतचे गोरेही आपणासारखेच अगोदरच होरपळून निघाले आहेत ह्याची त्यांना खबरच नव्हती !

त्या पांच दिवसांत राजधानी दिल्लींत इंग्रजी राजवटीचा मागमूसही बाकी नव्हता.

## स्वाध्याय

१. 'गंगा यमुनेला येऊन मिळाली.' ह्या वाक्याचें स्पष्टीकरण करा.

२. क्रांतिकारक शिपाई आणि बादशाहा ह्यांच्या भेटीचें वर्णन करा.

३. बादशाहा कां भीत होता ? त्याला शिपायांनीं धीर कसा दिला ?

४. क्रांतिकारक शिपायांच्या दिल्लीवरील मोर्च्याचे 'पांच दिवस' वर्णन करा.

५. दिल्लींत कत्तलीपासून आपला बचाव करण्यासाठीं इंग्रजांनीं काय काय हिकमती योजल्या ?





प्रकरण अकरावें

# शूर शीखांची पंजाबांत पिछेहाट



दिल्ली हातची गेली ! ही अशुभ वार्ता गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंग ह्याला कलकत्त्यांत बसून तारेनें ऐकायला मिळाली. त्या वार्तेवर प्रथम त्याचा विश्वासही बसेना.

सरसेनापति ॲन्सन तेव्हां सिमल्याच्या थंड हवेंत विसावा घेत बसला होता. तोंच त्याला कॅनिंगची तार मिळाली :

' दिल्ली हातची गेली. ती तुम्ही ताबडतोब जाऊन परत घ्यावी. '

' दिल्ली गेली ' ह्या आगीची झळ एवढी जबरदस्त होती कीं सिमल्याच्या थंड हवेंतही ॲन्सनच्या अंगाला त्या झळीचे चटके बसूं लागले. तो तसाच लगेच तडफडत दिल्ली घेण्याच्या कामगिरीवर निघाला, तो प्रथम अंबाला ठाण्यावर आला. तोदेखील अगदीं भांबावला होता.

अवघ्या आठवड्याच्या आंत मीरतच्या शिपायांनीं येऊन दिल्ली बळकावली ह्यावरून क्रांतिकारकांचें बळ किती जबरदस्त असलें पाहिजे ह्याची भीषण कल्पना ॲन्सनला करतां येत होती.

अंबाला ठाणेंदेखील अगदीं निर्भय नव्हतें. प्रथमच मंगल पांड्याच्या बलिदानानें माथीं भडकलेल्या तेथील शिपायांनीं लष्करी अधिकाऱ्यांच्या बंगल्यांना आगी लावून तीव्र असंतोष व्यक्त केला होता. पण मीरत-दिल्लींत क्रांतिकारकांनीं जे अनर्थपात केले आणि गोऱ्यांना क्रांतीच्या पेटत्या खाईंत होरपळून काढलें, त्या मानानें अंबाला येथील जाळपोळ कांहींच नव्हे.

शिवाय दुसऱ्याही एका दृष्टीनें अंबाला हें इंग्रजांचें अशा संकटकाळींही आसऱ्याला उपयोगी पडणारें आशास्थान होतें. इंग्रजधार्जिणीं अशीं पतियाळा, नाभा, झिंद हीं मोठीं शीख संस्थानें अंबाला–दिल्लीच्या टापूंतच होतीं. ह्या संस्थानांचा इंग्रजांना आधार होता. हे शीख राजे इंग्रजी राजवटींत स्वातंत्र्य गमावून बसलेले खरे, परंतु ऐन भरघडीला सुरू झालेल्या स्वातंत्र्ययुद्धांत जय अथवा पराजय कोणाचा, हें ठरवणारी परिस्थितीची आणि वस्तुस्थितीची नस ह्या मातबर शीखांच्या हातीं होती. सिंहासारखी शूर लढाऊ शीख जमात. ह्या क्रांतियुद्धांत शीख सामील झाले असते, तर इंग्रजी राजवटीचा चुराडा करून भारत हां हां म्हणतां झपाट्यासरसा स्वतंत्र झाला असता. निदान शीख तटस्थ राहाते, तरीही क्रांतियुद्धांत भारतानें इंग्रजांना धूळ चारून राजधानी दिल्लीवर भारताचा स्वातंत्र्यध्वज अखंड फडकत ठेवला असता.

परंतु नाभा, पतियाळा, झिंद हे राजे क्रांतिकारकांना तर मिळाले नाहींतच; पण तटस्थही राहिले नाहींत. ते क्रांतिकारक भारताचें कंबरडें मोडण्याच्या कामांत इंग्रजांना सामील झाले. ॲन्सनला त्यांनीं द्रव्यबळ, मनुष्यबळ, हवी ती मदत मुक्तहस्तानें देऊं केली. मग चिडलेले इंग्रज

क्रांतिकारकांवरच काय, पण अशा शूर सुपुत्रांना जन्म देणाऱ्या धन्य कुसव्याच्या भारतमातेवर माणुसकी सोडून भयंकर अत्याचार करायला कां भितील ?

ॲन्सन शीखांच्या बळावर अंबाला ते दिल्ली ह्या दरम्यानच्या मुलुखांतून गोऱ्या गिधाडी सोजिरांनिशीं नुसतें पाणी जाळीत निघाला. पण पंजाबचा हिमालयाच्या तळपायथ्याचा आगीसारखा प्रखर उन्हाळा त्याला मुळींच सहन होईना. तो पटकीनें आजारी पडून मेच्या २५ तारखेला वारला. त्याच्या जागीं सर हेन्री बर्नाक हा नवा सरसेनानी आला. तो तर ॲन्सनला भला माणूस म्हणावें इतका उग्र व कडवा. तो आला तो वाटेनें मुलुखांतील खेडोपाडींदेखील भयंकर जाळपोळ आणि कत्तल करीत आला.

आतां ही लांडगेधाड दिल्लीवर पडणार असें दिल्लींतील क्रांतिसेनेनें पाहिलें. कांहीं झालें तरी राजधानी दिल्ली हातची जाऊं द्यायची नाहीं, अशा निर्धारानें क्रांतिसेना दिल्लीबाहेर बुंदेल-की-सराईच्या रणक्षेत्रावर जाऊन इंग्रजी सेनेशीं सामना द्यायला पाय रोवून उभी राहिली. इंग्रजी सेना तर आतां फितूर शीखांच्या पाठबळामुळें अगदीं 'घोड्यावर' होती. बुंदेल-की-सराईत एकसारखी दोन दिवस दोन्ही पक्षांची रणधुमाळी माजली. क्रांतिसेना एका परीनें तोकडी. शिवाय इंग्रजी सेनेसारखी विपुल युद्धसामुग्री त्यांच्यापाशीं नव्हती आणि शीख त्यांच्या अस्तनींतील निखारेसे त्यांना डागीत सुटले होते. क्रांतीचा वणवा पूर्वयोजनेच्या अगोदर एकाएकीं भडकला, त्यामुळें ठिकठिकाणच्या क्रांतिसेना पुरेशा पूर्वतयारीच्या अभावीं आतां काय करावें अशा बुचकळ्यांत पडल्या होत्या. त्यामुळें क्रांतिसेनेचा संघटित सक्रिय पाठिंबा चालून येण्याच्या वाटा अडचणीच्या होऊन बसल्या होत्या. त्यामुळें बुंदेल-की-सराईच्या लढाईत जयाचें पारडें फिरलें. क्रांतिसेनेचें पारडें हलकें ठरून अधांतरीं तरंगूं लागलें. इंग्रजांचें पारडें विजयानें जड बुडाचें ठरलें.

वाघाचे सुळे उपटावे तसें गोऱ्या फौजेनें दिल्लींत कचाटींत सापडलेल्या हिंदी लष्कराला प्रथम निःशस्त्र केलें आणि मग त्याची अगदीं ससेहोलपट केली.

ह्या दिल्लीच्या इंग्रजी विजयांत भरीला भर म्हणून इंग्रजांनीं पूर्वीचे मुसलमान राज्यकर्ते आणि शीख ह्यांच्यांतील जुन्या तेढीचा उपयोग करून घेतला. त्या बाबतींत चतुराईची आणि कपटीपणाची अगदीं कमाल केली. दिल्लीच्या मोगल बादशाहीकडून शीखांचा मनस्वी छळ झाला, तो अखेरी अखेरीला. औरंगजेब बादशाहाच्या कारकीर्दींत तर त्या छळाची अगदीं बेहद्द झाली. शीखांचा पूज्य धर्मगुरु गोविंदसिंग ह्याला मोगलांनीं दिल्लीच्या लाल किल्ल्यांतच हाल हाल करून ठार केलें. शूर शीखांच्या अंतःकरणाला त्या भयंकर अत्याचारामुळें झालेली खोल जखम अगदीं ताजीशी वाहात होती. ती जखम सतत ताजी टेवणारी एक भविष्यवाणी फार दिवसांपासून जागत्या भुताटकीसारखी शीखांचीं माथीं भडकवीत होती. 'शीख दिल्ली घेतील आणि ज्या बादशाही सिंहासनापुढें गुरु गोविंदसिंगाला निर्दयपणें ठार करण्यांत आलें, तें बादशाही सिंहासन ठोकरून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून धुळीला मिळवितील.' ही ती भविष्यवाणी.

दिल्लीचें सिंहासन धुळीला मिळणें म्हणजेच मोगलांची राजधानींतील बादशाही सत्ता समूळ नष्ट होणें. दिल्ली पडते केव्हां अशी मुसलमानां-विरुद्ध शीखांना जी आज दीडशें वर्षांहून जास्त काळ अघोर उत्कंठा लागून राहिली होती, त्यांतलें इंगीत हें.

हिकमती इंग्रजांनीं त्या भविष्यवाणीच्या शब्दांवर कसरत करून नेमका तो शीखांच्या रोषाचा आगीचा झोत क्रांतिकारकांवर उलटविला. 'कंपनीसरकार आणि शीख एक होतील आणि दिल्लीचा पाडाव करतील' अशी त्यांनीं त्या भविष्यवाणीला कलाटणी देऊन आपल्या हस्तकांकरवीं शीख शिपायांत त्याचा खूप प्रचार केला.

मुसलमानांवर चिडलेल्या भावनाप्रधान शीखांना तें खरेंच वाटलें. आज ती वेळ येऊं घातली होती. दिल्लीविरुद्ध कंपनीसरकार आणि शीख एक होत होते. त्यांच्या एकीनें दिल्लीचा पाडाव होत होता.

शीखांच्या बादशाहाविषयींच्या गैरसमजुतींच्या क्रोधाग्नींत बनावट बादशाही जाहीरनाम्याचें तेल ओतून इंग्रजांनीं तो क्रोधाग्नि चेतविला. 'शीख जेथें जेथें सापडतील तेथें तेथें त्यांची कत्तल करा' अशा आशयाचे बादशाहाच्या सहीचे जाहीरनामे दिल्लीभर आणि दिल्लीच्या आसमंतांत सर्वत्र फडकूं लागले. ह्याप्रमाणें आपल्या नाशावर बादशाहा टपला आहे अशी शीखांची आणखी नवी खात्री झाली. अशा ह्या बादशाहाची सत्ता दिल्लींतून कायमची उखडून टाकण्यासाठीं शीख शिपाई कंपनीसरकारशीं अगदीं एकजीव झाले.

बादशाहाविषयींच्या द्वेपानें भारावलेल्या शीख शिपायांनीं दिल्लींतील नागरिकांची सर्रास कत्तल करण्याच्या कामीं इंग्रजांच्याही वर ताण केली. दिल्लींत नागरिकांच्या रक्ताचे जे पाट वाहिले, त्या रक्ताच्या लालींत शीख शिपायांच्या क्रूर खुनी पराक्रमाचा मोठा वांटा होता.

इंग्रजांच्या हस्तकांनीं इकडे दिल्लींत जसें शीखांना क्रांतिकारक शिपायांविरुद्ध बिथरविलें, तसेंच सरहद्दीवरील अफगाण टोळ्यांनाही बिथरविलें. खोडसाळ प्रचार, लांचलुचपत, फंदफितुरी, असा कोणताही बुरा मार्ग त्यासाठीं सुना सोडला नाहीं. पेशावरच्या पठाणांची सैन्यांत नवी भरती केली आणि त्या सैन्याच्या हातूनच पेशावरच्या क्रांतिकारक पलटणींना निःशस्त्र करून देशोधडीला लावलें. परागंदा झालेले बरेच सैनिक आसऱ्यासाठीं काश्मिरांत गेले. पण काश्मीरच्या इंग्रजधार्जिण्या राजा गुलाबसिंगानें त्यांना मुळींच थारा दिला नाहीं. उलट त्या आसऱ्याला आलेल्या राष्ट्रभक्त क्रांतिसेनेविरुद्ध सक्त हुकूम राजानें सोडले कीं जेथें जेथें हे बंडखोर सैनिक सापडतील तेथें तेथें त्यांना दयामाया न दाखवितां ठार करा.

राजाची ही सारी धडपड आपण कंपनीसरकारशीं किती राजनिष्ठ आहों हें दाखविण्यासाठीं चालली होती. आणि इंग्रज भेटले कीं त्यांच्याशीं राजा ह्या आपल्या बहाद्दुरीबद्दल शेखी मिरवीत होता !

एकूण काय ! शीख राजेरजवाडे आणि त्या काळीं 'राजा बोले दळ हाले' ह्या न्यायानें राजांच्या फितुरी देशद्रोही पावलांवर पावलें टाकून चालणारे शीख सैनिक ह्यांनीं पंजाबांत भारताला स्वातंत्र्य प्राप्त करून देणारी सत्तावनी क्रांति पुरती जायबंदी केली.

## स्वा ध्या य

१. अंबाला लष्करी ठाण्याचें इंग्रजांना सत्तावनच्या क्रांतियुद्धांत विशेष महत्त्व कां वाटलें ?

२. क्रांतिकारक भारताचें कंबरडे मोडण्यांत इंग्रजांना सामील झालेल्या पंजाबांतील राजांची माहिती सांगा.

३. बुंदेल-की-सराई येथील लढ्याचें वर्णन करा.

४. इंग्रजांनीं क्रांतिकारकांत फूट पाडण्यासाठीं दिल्लींत शीख आणि मुसलमान ह्यांच्यांतील तेढीचा खोडसाळ डावपेचांनीं कसा उपयोग करून घेतला ?

५. सरहद्दीवरील अफगाण टोळ्यांना इंग्रजांनीं कसें विथरविलें ?

६. काश्मीरच्या राजाचा ओंगळ मतलबी इंग्रजधार्जिणेपणा वर्णन करा.





प्रकरण बारावें

# घडणार नव्हतें तें घडलें !



" अंबाला, पंजाब, वायव्य सरहद्द-प्रांत असा दिल्लीचा उत्तर भारत बहुतेक सारा क्रांतीच्या ज्वालांनीं भडकला तर भडको. दक्षिण टापूंत तरी जिकडे तिकडे शांत आहे ! " असा कंपनीसरकारला दिल्लीच्या दक्षिण टापूंतील आपल्या हिंदी फौजेविषयीं दांडगा भरंवसा होता.

बरें ; मिनापूर, इटावा, बुलंद, वगैरे त्या टापूंतील लष्करी ठाण्यांवरील सैनिकांची वागणूकही इतकी साळसूदपणाची कीं अधिकाऱ्यांना संशय घ्यायला जरादेखील जागा सापडूं नये. बुलंद बाजारांत क्रांतिसमित्या आहेत हें अधिकाऱ्यांना माहीत होतें. पण त्या टापूंतील साऱ्या ठाण्यांवर तुकड्या तुकड्यांनीं वास्तव्य करणाऱ्या नवव्या पलटणीविषयीं अधिकाऱ्यांची खात्रीच कीं कितीही क्रांतिसमित्या आणि महासमित्या आल्या, तरी

आपले सैनिक त्या समित्यांनीं हातीं दिलेलें क्रांतीचें जळतें कोलीत घेऊन उत्तरेंतील पिसाट माथेफिरू शिपायांसारखे मुळींच नाचत सुटणार नाहींत.

गोऱ्या अधिकाऱ्यांचा हा अंदाज सर्वस्वी चुकीचा नव्हता.

मे महिन्यांतच क्रांतिदूत क्रांतीचा संदेश बुलंद शहराला सादर करण्यासाठीं आला. तो आदेश तत्त्वतः सर्व शिपायांना पटला. परंतु आपण ह्या क्रांतियज्ञांत उडी घेतली तर साधेल कीं फसेल, असें शिपायांचें मन हेलकावे घेत होतें. एकदम उडी घेण्याची त्यांची छाती होईना.

परंतु जी गोष्ट त्या क्रांतिदूतानें आणलेल्या संदेशानें साध्य होण्याची रेंगाळत पडली होती, ती त्या दूताच्या बलिदानानें साध्य झाली.

'गांव तेथें म्हारवडा' म्हणतात, तसे हिंदी लष्करांतही कंपनीसरकारचे फितूर हेर जागोजागीं पसरलेले होतेच. बुलंद शहरांतील लष्करी बराकींत असे तिघे शिपाई हेर होते. त्यांनीं तीं सारीं खलबतें चोरून ऐकलीं आणि जाऊन गुपचुप चुगली केली. लगेच त्या दूताला पकडून खटल्यासाठीं अलीगडला पाठविण्यांत आलें. कारण हिंदी लष्कराचें मुख्य ठाणें अलीगडला होतें.

आपला क्रांतिदूत पकडला गेलेला पाहून ह्याच बुलंदच्या शिपायांचीं माथीं भडकलीं. शिपाई मुळांतच धार्मिक वृत्तीचे. आणि तो दूत होता जातीनें ब्राह्मण. क्रांतीसारखें पवित्र कार्य करीत असतांना कोणालाही त्रास भोगावा लागला असें कळलें, तरी त्या शिपायांचें अंतःकरण कळवळे. अलीगडला त्याचा खटला चालणार, त्याचा न्याय होणार, म्हणजे त्याला फांशीची शिक्षा होणार, हें सारे शिपाई ओळखून होते.

"ही चुगली करणारे हरामखोर आपणांत कोण आहेत ?" जो तो विचारूं लागला. कसून चौकशी करतां करतां चुगलखोर सापडले. त्यांची सर्वांनीं इतकी छीःथूः केली कीं त्या शिपायांना वाटलें असेल, असल्या विटंबनेपेक्षां मरण शतपटींनीं बरें.

परंतु त्या चुगलखोरांवर आग पाखडून कांहीं तो क्रांतिदूत वांचणार नव्हता.

" बस्स! त्या ब्राह्मणाला आपण कांहींही करून वांचविलेंच पाहिजे. त्याला सोडविलेंच पाहिजे. " सर्व शिपायांच्या एकमतानें ठरलें.

आणि ठरल्या बेताची लगेच अंमलबजावणी झाली. चलो अलीगड.

परंतु अलीगडांत ते बुलंदचे शिपाई जाऊन पोचतात, तों पूर्वींच त्या दूताचा न्याय झाला होता. त्याला फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली होती आणि क्रांतिकारक विचार मनांत बाळगणाऱ्या शिपायांना दहशत बसावी म्हणून सर्व लष्करी तुकड्यांना परेडीच्या मैदानावर मुद्दाम जमा करून त्यांच्या देखत शिक्षेची अंमलबजावणी झाली होती. बुलंदचे क्रांतिकारक अलीपुरांत जातांक्षणीं मैदानावर जाऊन पाहातात तों तो ब्राह्मण दूत त्यांना फांसावर लटकलेला पाहायला मिळाला.

त्या देशभक्त दूताचें बलिदान एका अर्थानें सार्थकीं लागलें. कंपनी-सकारची अत्यंत भरंवशाची राजनिष्ठ नववी पलटण एकदम बिथरली. सारे शिपाई शस्त्रें घेऊन राजरोसपणें गर्जत आपल्या बराकींबाहेर पडले.

" मारो फिरंगी को ! "

इंग्रजांना फार नवल वाटलें. तितकेंच प्राणांचें भयही वाटूं लागलें. बराकपूर-मीरत-दिल्ली वगैरे ठिकाणचे ' मारो फिरंगी को ' चे पडसाद त्यांच्या कानीं रोज घुमत होते. तीच आतां आपलीही गत होणार ह्या भीतीनें कुठचें काय आणि कुठचें काय ! सारे गोरे अलीपुरांतून जीव मुठींत घेऊन पळाले.

ही बातमी वाऱ्यासारखी आजूबाजूच्या टापूंत पसरली. मिनापूरचे शिपाईही तें ऐकून बुलंद-अलीपूरच्या शिपायांसारखेच भडकले. आणि ' मारो फिरंगी को ' हा मंत्र जपत सारें दारूगोळा साहित्य उंटावर लादून घेऊन चालले.

कोठें ? हें कोणीं विचारण्याची गरज नव्हती कीं सांगण्याची गरज नव्हती. 'चलो दिल्ली' हा महामंत्र आतां सर्वांनीं अगदीं जिव्हाळ्यानें आत्मसात् केला होता. त्यांचें क्रांतीचें महादैवत दिल्लीला होतें. दिल्लीच्या बादशाहानें क्रांतिकारकांचें पुढारीपण पत्करलें होतें.

जवळच अजमीरपासून बारा मैलांवर नसिराबाद ठाणें होतें. त्या ठाण्यावर गोऱ्या सोजिरांची तुकडी होती. तिच्या जोडीला तिसावी देशी पायदळ पलटणही होती. त्या देशी शिपायांना ही अलीगडची वार्ता कळली मात्र आणि लगेच २८ मे रोजीं तेही गोऱ्यांचे बंगले जाळून वाताहात करून कंपनीसरकारच्या इंग्रजी राजवटीचें लंकादहन करीत दौडत निघाले. त्यांना शिक्षा करायला गोऱ्या सोजिरांची तुकडी आडवी आली, ती शाळूचीं कणसें कापावीं तशी कापून काढीत शिपाई दिल्लीच्या रोखानें चालले.

परंतु असलें हें कटु सत्य निर्माणच कां बरें झालें ? शीखांमुळें का ? शीख तरी इतके सिंहाचे छावे शोभणारे लष्करी बाण्याचे शूर आणि स्वाभिमानी असतांना तेवढेच शिपाई ह्या स्वातंत्र्यसंगरापासून अलिप्त कां राहिले ? काय, त्यांना स्वातंत्र्य नको होतें ? गुलामगिरीची त्यांना आवड होती ? शीख राजेरजवाड्यांचें एक सोडा. ते कांहीं 'शीख' म्हणून क्रांतीपासून अलग राहिले असें नव्हे. ते राजेरजवाडे म्हणून अलग राहिले. पुढें आपणाला ओघानें आढळून येईल कीं ग्वाल्हेरच्या हिंदु—अस्सल शूर मराठा—राजानेंही शीख राजांसारखेंच ओंगळ वर्तन केलें. हा हिंदी राजांचा केवळ मतलबसाधुपणा होता.

पण शीख शिपाई क्रांतीपासून अलग राहिले, ह्याचें कारण ते मतलब-साधु अथवा इंग्रजधार्जिणे होते हें खास नव्हे. मुसलमान बादशाहांनीं पूर्वी शीख जमातीची इतक्या निर्दयपणें ससेहोलपट केली होती कीं त्याचा शीखांना पिढ्यानूपिढ्या विसर पडणें शक्यच नव्हतें. त्यांना वाटलें असेल कीं ह्या क्रांतीचा पुढारी दिल्लीचा बादशाहा. क्रांति यशस्वी झाली, इंग्रजी

सत्तेची भारतांतून उचलबांगडी झाली, तर पुन्हा औरंगजेब बादशाहाच्या वंशांतील मुसलमान बादशाहाचाच अंमल देशावर चालू होणार आणि पुन्हा शीखांची ससेहोलपट करायला मुसलमानांना संधि मिळणार. त्यापेक्षां कंपनीसरकारचा इंग्रजी अंमल चालू आहे तोच लाखपटींनीं बरा !

शीखांचें हें तेव्हांचें भय खरें असो कीं खोटें असो. पण भय वाटायला जागा होती एवढें खरें.

## स्वा ध्या य

१. दिल्लीच्या दक्षिण टापूविषयीं गोऱ्या अधिकाऱ्यांना क्रांतीच्या बाबतींत कसा भरंवसा वाटत होता ?

२. बुलंद शहरांत आलेल्या क्रांतिदूताची कहाणी सांगा.

३. ‘ क्रांतिदूताच्या संदेशानें जें काम झालें नाहीं, तें त्याच्या बलिदानानें झालें ’ ह्या वाक्याचा अर्थ स्पष्ट करा.

४. ‘ मारो फिरंगी को ’ ह्या परवलाचा उगम केव्हां व कसा झाला ?

५. बुलंदचे शिपाई अलीगडांत कां गेले ?

६. नसिराबाद ठाण्यावर अलीगडच्या उठावाचा काय परिणाम झाला ?

७. शीख ह्या क्रांतियुद्धांत कां सामील झाले नाहींत ?





प्रकरण तेरावें

# ह्यांना म्हणतात रोहिले !



रोहिलखंडांतील रोहिले पठाण तर दुष्ट कंपनीसरकारवर सूड घेण्याची संधि केव्हां सापडते ह्याची डोळ्यांत तेल घालून वाटच पाहात होते. कारण ताटाबरोबर कांठ तसें त्यांचें रोहिलखंडचें राज्य अयोध्येच्या नबाबाच्या राज्याबरोबरच बुडालें होतें. रोहिले हे अयोध्येच्या नबाबाचे मांडलिक.

अयोध्या हें असंतोषाचें म्हणजेच क्रांतीचें आगर. रोहिलखंडही क्रांतिकारक कल्पनांनीं पूर्वीच झपाटलें होतें. इतकेंच काय पण एप्रिल महिन्यांत तिकडे बराकपुरांत मंगल पांड्यानें ज्या नव्या काडतुसांच्या निमित्तानें क्रांतीचें रणशिंग फुंकीत स्वतःचें बलिदान केलें, त्याच काडतुसांनीं बरेलीला रोहिले शिपायांचा इस्लामी आवेशाही फुंकर घालून जागा केला

होता. तेव्हां रोहिलखंडांत बरीच खळबळ उडाली होती. परंतु ती आग तेव्हां धुमसतां धुमसतां विझली अथवा दबली, इतकेंच.

परंतु ती आग दबतां दबतां पुन्हा तारीख १४ मेला मीरतचा उठाव होतांच धुमसूं लागली. रोहिल्यांचा कडवा इस्लामी बाणा इंग्रजांना माहीत होता. रोहिला ठीक आहे तोंवर सरळ सूत आणि एकदा बिथरला कीं मोडक्या झाडावरचें भूत! हा रोहिल्यांचा स्वभावविशेष इंग्रज ओळखून होते. त्यांनीं जरी अयोध्येबरोबरच रोहिलखंडही खालसा केलें, तरी त्यांतल्यात्यांत रोहिल्यांचें नाक दाबून धरायला ते चुकले नाहींत. हें नाक म्हणजे रोहिला खान हफीज रहमत. त्याचा शेवटचा वारस तरुण रोहिला खान बहादुरखान ह्याला इंग्रजांनीं दोन वर्षासनांच्या सोन्याच्या सांखळीनें अडकवून ठेवलें होतें. खान बहादुरखान हा रोहिलखंडाचा वारस ह्या नात्यानें एक वर्षासन आणि दुसरें वर्षासन तो इंग्रजांचा रोहिलखंडांतील न्यायाधिकारी म्हणून.

ह्यावरून सर्व रोहिल्यांचा ठाम समज होऊन बसला होता कीं आपला खान हा कंपनीसरकारच्या खास विश्वासांतला, अगदीं गळ्यांतला ताईत आहे. आणि तें पुष्कळ अंशीं खरेंही होतें. इंग्रजांचा जसा तिकडे नानासाहेब पेशव्याच्या भलेपणावर भरंवसा होता, तसाच इकडे ह्या तरुण रोहिला खानावरही भरंवसा होता.

असें असतांही जेव्हां मेच्या १४ तारखेला मीरतच्या उठावाची बातमी बरेलीला येऊन धडकली, तेव्हां रोहिले शिपायांत चुळबुळ सुरू झाली. आणि इंग्रजांचेंही धाबें दणाणलें. लगेच त्यांनीं आपलीं सारीं बायकामुलें नैनितालला सुरक्षित जागीं रवाना केलीं. हो! मीरतसारखा मरायचाच प्रसंग आला तर इकडे आपलेंच काय बरें वाईट होणार तें होवो. बायका आणि चिलींपिलीं तरी तिकडे सुरक्षित असावीं.

लगेच दुसऱ्या दिवशीं मेच्या १५ तारखेला चीफ ऑफिसर ब्रिगेडियर सिबाल्ड ह्यानें परेडीच्या मैदानावर स्वतः जाऊन शिपायांना राजनिष्ठेचा

गोड उपदेश केला. नव्या काडतुसांना सुळसुळीत होण्यासाठीं जशी चरबी चोपडलेली असे, तसा आपला उपदेश सुळसुळीत होऊन रोहिले शिपायांच्या पचनीं पडण्यासाठीं त्याला सरसेनापतीच्या नव्या भल्या हुकुमाची जोड देण्यांत आली होती.

' ह्यापुढें साऱ्या भारतभर कोठेंही नवीं काडतुसें शिपायांना वापरायला द्यायचीं नाहींत. ' असा तो हुकूम होता.

पेटत्या आगीवर वाळू ओतून आग विझवावी तसा सरसेनापतीच्या त्या हुकुमाचा थोडा अपेक्षित उपयोग झाला. पण तितकाच अथवा त्याहूनही अधिक वाईट परिणामही झाला. रोहिले शिपायांनीं मनांत ओळखलें कीं क्रांतिकारकांना इंग्रज डरला रे डरला.

अशा विजयोन्मादांत रोहिले थोडेसे दंग असतांनाच दिल्लीहून बादशाहाच्या नांवाचें क्रांतिकारक आज्ञापत्र येऊन थडकलें आणि तें आज्ञापत्र त्यांना गुप्त बैठकींत वाचून दाखविणारा सरकारचा विश्वासू रोहिला खान बहादुरखान !

रोहिलखंडांतील क्रांतिसमितीचा संचालक देखील हा तरुण रोहिला खानच होता !

मग काय ! रोहिला मागतो एक डोळा तर अल्ला देतो दोन; त्यांतली अवस्था. बादशाहाचें आज्ञापत्र सर्व रोहिल्यांनीं शिरसावंद्य मानलें. अखिल भारतीय उठावाची तारीख मुळांत ३१ मे ठरली होती. त्या तारखेला रोहिलखंडांतही क्रांतीचा स्वातंत्र्यध्वज फडकविण्यांत यावा अशा आशयाचें तें आज्ञापत्र होतें.

ती तारीख ३१ मे उजाडली. त्या दिवशीं बरेलीच्या रोहिले शिपायांनीं कॅ. ब्राउनलेच्या बंगल्याला आग लावून क्रांतीचा मुहूर्त केला. अवघ्या सहा तासांत सारी बरेली क्रांतिकारक शिपायांच्या पाठीशीं धीर देत उभी राहिली. बरेलीच्या ठाण्यावरचें इंग्रजांचें निशाण खालीं ओढून पायांखालीं तुडविण्यांत

आलें. त्या जागीं बादशाहाच्या जयजयकारांत स्वतंत्र भारताचा विजयध्वज डौलानें फडकूं लागला.

क्रांतीचें पुण्याहवाचन ठाण्याठाण्यावर करतांना काय काय संस्कार करावे ह्यांची रोहिले शिपायांना आजवर इतर ठिकाणीं झालेल्या उठावाच्या वार्ता ऐकून माहिती होतीच. तोच सोहळा रोहिलखंडांतही विधिपूर्वक साजरा झाला. गोऱ्या अधिकाऱ्यांच्या बंगल्यांच्या होळ्या पेटल्या. गोऱ्यांची कत्तल झाली. दारूगोळा, खजिना जें कांहीं हातीं सापडलें त्याची लूट झाली. अवघे बत्तीस गोरे तरी वेष पालटून जीव घेऊन लपत छपत नैनितालकडे पळाले, म्हणून बचावले. बाकी गोरी कातडी अशी रोहिलखंडांत नमुन्यालाही जिवंत राहिली नाहीं. असा क्रांतिकारकांचा अंमल रोहिलखंडभर जारी करीत इंग्रजी तोफखान्याचा सुभेदार बख्तखान हाच क्रांतिसेनेचें सेनापतित्व पत्करून विजयोत्सव साजरा करीत बरेलीकडे रवाना झाला. इंग्रजांनीं मोडून टाकलेला रोहिल्यांचा अंमल रोहिल्यांना रोहिलखंडावर पुन्हा प्रस्थापित करायचा होता. इंग्रजांची गुलामगिरी झुगारून देऊन स्वतंत्र व्हायचें होतें.

तो समारंभ बरेलीला इतमामानें आनंदीआनंदांत साजरा झाला. खान बहादुरखान हा खानाच्या पिढीजाद गादीवर आरूढ झाला. पण आरूढ झाला तो बादशाहाचा सुभेदार म्हणून. हा नवा सुभेदार बादशाहाचा अंकित ह्या नात्यानेंच रोहिलखंडांत नवी राजवट स्थापन करून कारभार पाहूं लागला.

क्रांतिकारकांचें न्यायालय देशद्रोही इंग्रज शत्रूंचा न्यायनिवाडा करण्यासाठीं स्थापन झालें. इंग्रजांना मान्य असलेला असा त्यांच्या विश्वासांतील न्यायाधिकारीच त्यांना न्यायाधीश लाभला. सारे बडे बडे इंग्रज अधिकारी त्याचे मित्र होते. तेथला डॉक्टर, बरेलीच्या 'लेफ्टनंट गव्हर्नरचा जांवई, तेथील सरकारी कॉलेजचा प्रिन्सिपल, बरेलीचा डिस्ट्रिक्ट जज्ज, हे सारे कालपावेतों खान बहादुरखानाचे मित्र. तेच आज त्याच्यापुढें देशद्रोही गुन्हेगार म्हणून बांधून आणून उभे करण्यांत आले. सर्वांचा न्याय झाला.

त्या सर्वांना फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. रोहिलखंडचा गोरा चीफ कमिशनर तेवढ्यांतल्या तेवढ्यांत सर्वांची नजर चुकवून पळाला. त्याला पकडून देणाराला एक हजार रुपयांचें बक्षीस सुभेदाराकडून जाहीर करण्यांत आलें.

अवघ्या आठ प्रहरांत सूर्यास्तापूर्वीं ह्या साऱ्या यशस्वी घडामोडी अंमलांत आल्या. बादशाहाचा आज्ञाधारक सुभेदार ह्या नात्यानें खान बहादुरखानानें दिल्लीला बादशाहाच्या पायांपाशीं सादर करण्यासाठीं रोहिलखंडांतील त्या राज्यक्रांतीचा सविस्तर खलिता जासुदाहातीं ताबडतोब रवाना केला आणि बादशाहाच्या वतीनें आपल्या सहीशिक्क्यानिशीं पुढील जाहीरनामा काढला :

" भारतीय नागरिकांनो ! आपण फार दिवसांपासून ज्याची आतुरतेनें वाट पाहात होतों, तो स्वराज्याचा उत्सवाचा दिवस आज उगवला आहे. हा उत्सव तुम्ही साजरा करणार कीं हातपाय जोडून कोपऱ्यांत गप्प बसून स्वराज्य हातीं आलेलें हातचें गमावणार ? हिंदु-मुसलमान भाई हो ! तुम्ही एवढें एक पक्कें ध्यानीं ध्या कीं आपण इंग्रजांना जर ह्यापुढें भारतांत राहूं दिलें, तर ते आपली सर्वांची कत्तल करतील आणि आपला धर्म बुडवितील. आम्हां भारताच्या नागरिकांची आजवर इंग्रज फसवणूक करीत आहेत. तें न उमजून आजवर आम्ही आमच्या माना कापून घेत आलों. आतां तरी आपण अजाणतेपणीं आपल्या मायभूशीं झालेली दगलबाजी कशी सहन करीत आलों त्याचा विचार केला पाहिजे. इंग्रज अजूनही फोडा आणि झोडा ह्या आपल्या जुन्या मतलबी वागणुकीनें आपणाला फसवूं पाहातील. ते अजूनही हिंदु-मुसलमानांना एकमेकांविरुद्ध चिडवून त्यांच्यांत तंटे लावून देण्याचा उपद्याप करतील. परंतु हिंदु भाई हो ! तुम्ही ह्या इंग्रजी सापळ्यांत सापडूं नका. इंग्रज लोक आपलीं वचनें कधींच प्रामाणिकपणें पाळीत नाहींत हें आमच्या हिंदु भाईंना नव्यानें सांगायला पाहिजे असें नाहीं. असल्या हातचलाखींत, तोंडचलाखींत आणि लांडीलबाडींत इंग्रज पुरे निष्णात आहेत. ते आपल्या ख्रिस्ती

धर्माखेरीज बाकीचे सारे धर्म जगांतून नष्ट करायला चंग बांधून उठले आहेत. आपल्या दत्तकांचे हक्क त्यांनीं बुडविले नाहींत काय? आमच्या राजामहाराजांचीं धनंतर राज्यें त्यांनीं धुळीला मिळविलीं नाहींत काय? नागपूरचें राज्य, लखनौचें राज्य, हीं कोणीं बुडविलीं? हिंदु-मुसलमानांची सर्रास पायमल्ली कोणीं केली? मुसलमान भाईनो! तुम्हांला तुमच्या पवित्र कुराणाविषयीं आदर वाटतो ना? हिंदु भाईनो! तुम्हांला तुमच्या पवित्र गोमातेविषयीं आदर वाटतो ना? तर मग तुम्ही दोघेही आपसांतील साऱ्या गैरसमजुती विसरून ह्या पवित्र संग्रामाला सिद्ध व्हा. एका निशाणाखालीं रणमैदानावर खांद्याला खांदा भिडवून उभे राहा आणि भारतावरील इंग्रजांची नांवरस त्यांच्या रक्तानें धुऊन काढा. ह्या स्वातंत्र्ययुद्धांत हिंदु भाई जर मुसलमान भाईंच्या हातांत हात घालून एकदिलानें लढूं लागतील, तर त्यांच्या उज्ज्वल स्वदेशाभिमानाचें पारितोषिक म्हणून साऱ्या भारतांत गोहत्या सर्रास बंद करण्यांत येईल. ह्या पवित्र युद्धांत जो कोणी स्वतः लढायला उभा राहील, अथवा आर्थिक मदत करून इतरांना लढायला हातभार लावील, तो इहलोकीं आणि परलोकीं मुक्त होईल. ह्या युद्धाला जो कोणी विरोध करील, तो स्वतःच्या हातानें स्वतःचा गळा कापून घेईल आणि आत्महत्येच्या पापाचा धनी होईल."

### स्वा ध्या य

१. रोहिलखंडांतील रोहिले इंग्रजांविरुद्ध कां खवळले?
२. खान बहादुरखान रोहिल्याच्या बाबतींत इंग्रजांच्या काय अपेक्षा होत्या?
३. मेचा अखेरचा दिवस क्रांतिकारक रोहिल्यांनीं कसा साजरा केला?
४. बख्तखान हा कोण? त्याचा क्रांतिकारकांना कसा उपयोग झाला?
५. रोहिलखंडावर रोहिल्यांचा अंमल पुन्हा कसा स्थापन झाला?
६. बरेलींतील क्रांतिकारकांच्या न्यायालयाची माहिती द्या.
७. खान बहादुरखानानें दिल्लीच्या बादशाहाच्या वतीनें काढलेल्या जाहीरनाम्याची माहिती द्या.
८. जाहीरनामा बादशाहाच्या नांवानें कां काढला?





## प्रकरण चौदावें

# काशी-प्रयागाचें आंदोलन



बनारस ( काशी ) आणि अलाहाबाद ( प्रयाग ) हीं कंपनीसरकारचीं उत्तर भारतांतील मोक्याचीं लष्करी ठाणीं. बनारसचें ठाणें जवळच शिक्रोलीला कलकत्त्यापासून अवघें बत्तीस मैल अंतरावर होतें. ह्या दोन्ही ठाण्यांवर क्रांतीचे धक्के बसूं लागले. क्रांतिसमित्या आपलें गुप्त कार्य करीत होत्याच. त्यांच्या कार्याला दिल्लीकडील बातम्या ऐकून अधिक जोर चढला. लोक क्रांति विजयी होण्यासाठीं आणि इंग्रजांचा भारतांतून समूळ नायनाट व्हावा म्हणून देवळादेवळांतून, मशिदीमशिदींतून उघड उघड प्रार्थना करूं लागले. त्यांना आतां इंग्रजांचें भय वाटेनासें झालें.

इतके हिंदी शिपाईच नव्हे तर साधारण नागरिकही बेडर होऊं लागलेले पाहून गोरे लोक मात्र घाबरले. मीरतला, दिल्लीला क्रांतिकारकांनीं

आपल्या भाईबंदांची कशी ससेहोलपट केली, हें माहीत झाल्यापासून साऱ्या गोऱ्यांच्या पोटांत भीतीचा गोळा उठला होता.

परंतु येथेंही क्रांतीला अपशकुन करायला आणि गोऱ्यांची फितुरी खुशामत करायला शीख एका पायावर तयार होते. त्यासाठीं आणि स्वसंरक्षणासाठीं त्यांनीं शीख स्वयंसेवक दल उभारलें. त्या दलाच्या धीरावर इंग्रज लोक तग धरून होते. त्यांना स्वकीय गोऱ्या सोजिरांची मदत अशा आणीबाणीच्या वेळीं झटपट मिळणें शक्यच नव्हतें.

तोंच सर्व भारतीयांच्या संमतीनें क्रांतिनेत्यांनीं पुकार केलेली ३१ मे ही उठावाची तारीख उजाडली. त्याबरोबर जिकडे तिकडे एकदम भडका उडाला. बनारसच्या बराकी एकदम खवळून उठल्या. जाळपोळ, हाणामार 'फिरंगी को मारो'च्या तालासुराच्या साथीनें एकदम सुरू झाली. इंग्रजांना अगदीं दे माय धरणी ठाय होऊन गेलें.

बनारसपासून साठ मैलांवर अजिमगड ठाणें होतें. ३१ मेला क्रांतीचा लढा सुरू झाला तेव्हांपासून अजिमगडचे शिपाई उठावाला अगदीं उत्सुक झाले होते. पण तरीदेखील ते शक्य तितका संयम राखून सावधपणानें वागत होते. इतर ठिकाणच्याप्रमाणें अजिमगडांतही गोऱ्यांच्या बंगल्यांची होळी आणि गोऱ्या लोकांची ससेहोलपट ही आतां एक मामुली गोष्ट वाटण्याजोगी परिस्थिति होती. परंतु समंजस शिपायांनीं उदार मनानें गोऱ्या अधिकाऱ्यांना पळून जाऊन जीव बचावण्याची संधि दिली. गोऱ्यांनींही त्या संधीचा तत्परतेनें उपयोग करून घेतला. तरी लेफ्टनंट हचिन्सन आणि क्वार्टर सार्जंट लुइस हे दोन लष्करी अधिकारी तर क्रांतिकारकांच्या रोषांत होरपळून ठार झालेच. बाकीचे मात्र बचावले.

तेवढ्यांत गव्हर्नर जनरल कॅनिंगनें तत्परतेनें कांहीं गोरी सेना बनारसच्या मदतीला कलकत्त्याहून रवाना केली. ती बनारसला येऊन पोचली. तिकडे चीनवरील स्वारीची जारीनें तयारी चालली होती. त्यासाठीं कॅनिंगनें मुंबई,

मद्रास, रंगून येथून गोरे सैनिक मुद्दाम बोलावून घेतले होते. त्यांतून त्याला बनारसच्या मदतीसाठीं सैन्य पाठवितां आलें.

तें गोरें सैन्य बनारसला येऊन पोचलें आणि अजिमगडची बातमी येऊन थडकली. जें तेथें झालें, तें येथेंही होणारच, हें इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांनीं हेरलें आणि तसा प्रसंग येण्यापूर्वींच देशी शिपायांना तडकाफडकी निःशस्त्र करून नोकरींतून काढून टाकण्याचा निर्णय केला.

तारीख ४ जूनला सकाळीं परेडीच्या वेळीं वरिष्ठांनीं हुकूम फर्माविला. " सर्व शिपायांनीं शस्त्रें खालीं ठेवावीं. त्यांच्या नोकरीची कंपनीसरकारला ह्यापुढें गरज नाहीं. "

शिपायांनीं ह्याचा परिणाम ओळखला. कंपनीसरकारला त्यांच्या नोकरीची गरज नसली तरी त्यांना कंपनीसरकारच्या नोकरीची गरज होती ना ! शस्त्रें मुकाटपणें खालीं ठेवून शिपायांना स्वातंत्र्यसंग्राम कसा लढतां आला असता ? त्यांनीं शस्त्रें खालीं ठेवण्याचें नाकारलें आणि तसाच जवळच्या दारूगोळ्याच्या सरकारी कोठारावर मोर्चा वळविला. दारूगोळा लुटला. अनेक अधिकाऱ्यांना कंठस्नान घातलें. त्यांना दमदाटी द्यायला कमांडर गाइस पुढें आला, ठार. त्याची जागा घ्यायला ब्रिगेडियर डॉग्सन आला, तोही ठार. तो मात्र मेला तो मरतां मरतां आश्चर्यानें तोंड वासून मेला. शीख शिपाई आपणावर गोळी झाडतो, ह्याचा त्याला मरतां मरतां अर्थच कळेना.

पण डॉग्सनला माहीत नव्हतें कीं भांगेंत तुळस तेवढीच एक रुजली होती. शीख शिपायांची तुकडी सोजिरांच्या मदतीला शेजारींच खडी होती ; त्यांतलाच तो शीख शिपाई. तो इंग्रजधार्जिणेपणाच्या ब्रीदाला जागला नाहीं, ह्याबद्दल त्याच्या जातभाई शिपायांनीं तेथल्या तेथें त्याचीं खांडोळीं करून टाकलीं.

पण ह्या परेड मैदानावरील साऱ्या घडामोडी इतक्या संशयित वातावरणांत आणि वेगानें होत होत्या कीं त्या भाऊगर्दींत शीख आपले कीं

परके हें ओळखण्याइतकेंही भान इंग्रज अधिकाऱ्यांना उरलें नाहीं. हिंदी फौज गोऱ्यांच्या जिवावर उलटली आहे असा त्यांचा त्या एका शीखावरून दृढ समज झाला. त्यासरसा गोऱ्या गोलंदाज सोजिरांनीं हिंदी सैन्यावर तोफांचा जोरदार मारा सुरू केला. त्यांत सुक्याबरोबर ओलेंही जळूं लागलें. जी गत क्रांतिकारक देशी शिपायांची, तीच शीख शिपायांचीही झाली.

शीखांनाही तेव्हां वाटलें कीं गोरे लोक आपणावर उलटले. खाल्ल्या घरचे वांसे मोजूं लागले. त्यांनाही मग चेव आला. क्रांतिकारकांच्या खांद्याला खांदा भिडवून तेही मग गोऱ्या सैन्यावर तुटून पडले. परधार्जिण्या शीखांना सत्तावनी क्रांतियुद्धांत एवढाच काय तो अपवाद ठरला.

तथापि बनारसचा राजा, शीख सरदार व कांहीं विद्वान् पंडित ह्यांची मदत इंग्रजांना अखेरपावेतों झाली.

अखेर बनारस इंग्रजांच्या हातीं पडलें खरें, परंतु तेथें भडकलेली आग मात्र तेवढ्यानें विझली नाहीं. ती तेथून साऱ्या उत्तर भारतांत झपाट्यानें पसरत चालली.

इंग्रजी लष्कराचे अत्याचार त्या आगीहूनही भडकत चालले. कृतान्तकाळ इंग्रज सेनापति जनरल नील आजूबाजूच्या प्रदेशांतील शिपायांचा बंडावा मोडायला लष्कर घेऊन निघाला. तो साऱ्या मुलुखांत जाळपोळ, कत्तल असे अनन्वित अत्याचार करून सूड घेत पुढें चालला.

उत्तर प्रदेशांतील इंग्रजांचें मुख्य लष्करी ठाणें अलाहाबाद हें होतें. तेथें वास्तविक अशा आणीबाणीच्या वेळेला तोंड देण्यासाठीं अधिक खंबीर बंदोबस्त पाहिजे होता. परंतु त्या ठाण्यावर बंदोबस्ताची म्हणण्याजोगी तयारी नव्हती. देशी शिपायांच्या राजनिष्ठेवर इंग्रज अधिकाऱ्यांचा पूर्ण भरंवसा. पाण्याच्या पोटीं अग्नि पेटत असतो तशी ह्या भरंवशाच्या पोटीं इंग्रजांना नकळत प्रचंड क्रांतिकारक संघटना धुमसत होती.

मीरतच्या उठावाची बातमी येऊन थडकली तेव्हां तर लष्कराची अवघी सहावी तुकडी आणि शीख पलटणींतील दोनशें लोक एवढेंच लष्करी

बळ ठाण्यावर होतें. त्यानंतरही जरी थोडीशी तयारी झाली, तरी ती एकंदरींत बेताचीच होती. देशी शिपाई तेथील उठावाची नियोजित ६ जून तारीख उजाडेपावेतों अशी बेमालूम समाधि लावून बसले होते कीं कोणाला कोठें कांहीं जाग मिळूं नये. अकालीं उतावळेपणानें केलेला उठाव किती भयंकर स्वरूपानें आपणावरच उलटतो, ह्याचा येथवरच्या अनुभवावरून अलाहाबादचे क्रांतिकारक शिपाई धडा शिकले होते.

ती जूनची ६ तारीख उजाडली मात्र, त्या दिवशीं सकाळपासून ज्वाला पेटायला सुरुवात झाली. परेड मैदानावर सारे शिपाई नेहमींसारखे परेडीला गेले. पण आज वरिष्ठांचा कोणताही हुकूम मानण्याची त्यांची तयारी नव्हती. वरिष्ठ गोऱ्या अधिकाऱ्यांना हें काय माहीत! ते रोजच्या संवयीप्रमाणें लष्करी शिस्तीचे हुकूम सोडूं लागले. हुकूम सुटूं लागले मात्र, त्यांना शिपायांकडून गोळ्या झाडून उत्तर मिळूं लागलें. ले. अलेक्झांडर, ॲडमिरल स्टुअर्ट, प्लुंकेट, डॉवेज, प्रिंगले, पन्से, वर्च, इनेस असे बडेबडे गोरे लष्करी अधिकारी घडाधड ठार झाले.

असा गोऱ्या अधिकाऱ्यांचा फडशा केल्यावर शिपायांचा मोर्चा गोऱ्या वस्तींतील बंगल्यांकडे वळला. बंगल्यामागून बंगले जाळून टाकण्यांत आले. दरम्यान जे इंग्रज हातीं सापडले त्यांना ठार करीत शिपायांचा मोर्चा तुरुंगाकडे वळला. शहरांत त्यांना अगोदर जाण्याची आवश्यकता वाटली नाहीं. क्रांतिकारकांचा मुरब्बी खंबीर नेता मौलवी लियाकत अलीखान हा एक भला गृहस्थ होता. तो तर रयतेच्या गळ्यांतला ताईत. त्याच्या पुढारीपणाखालीं सारें शहर जणूं रणमैदानांत लढायला उभें राहावें तसें सावधपणें गनिमी काव्यानें 'दग्धभू' लढत देत होतें. तारायंत्राच्या तारा तुटत होत्या. आगगाडीचे लोखंडी रस्ते निकामी होत होते. आगगाडीच्या इंजिनांचा चुराडा होत होता. क्रांतीला विरोध करणारे अर्थात् इंग्रजधार्जिणे देशकंटक कोणी हातीं सापडले कीं ते जिवंत सुटायचे नाहींत. त्यांनीं

जर इंग्रजांविरुद्ध लढण्याची शपथ घेतली, तरच त्यांना जिवंत सुटण्याची कांहीं आशा.

क्रांतिकारकांनीं तुरुंगाचे दरवाजे फोडून तुरुंगांतील बांधव मोकळे सोडले. तें क्रांतिकारक नागरिकांना आणखी नवें पाठबळ मिळालें.

जूनच्या १७ तारखेला क्रांतिकारकांनीं अलाहाबादच्या सरकारी खजिन्यावर चाल केली. खजिन्याचें संरक्षण करणाऱ्या शिपायांना कंठस्नान घालून खजिन्याचा ताबा घेतला. सुमारें तीस लाख रुपये खजिन्यांत सापडले. इंग्रजी निशाण काढून फाडून टाकण्यांत आलें. त्या जागीं कचेरीवर क्रांतिकारकांचा स्वतंत्र भारताचा विजयध्वज फडकूं लागला. अलाहाबादेंतील कंपनीसरकारच्या राजवटीची इतिश्री करणाऱ्या त्या स्वातंत्र्यध्वजाला नागरिकांनीं आणि क्रांतिकारक शिपायांनीं मानवंदना दिली.

आतां कंपनीसरकारच्या सत्तेचा अवशेष अलाहाबादेंत राहिला असा तेथील बळकट आणि सुसज्ज किल्ला. तो घेण्यासाठीं क्रांतिसेना चालून गेली. किल्ल्यांतही क्रांतीची धुरा वाहाण्याला उत्सुक असलेली देशी सेना होतीच. त्या सेनेचा बाहेरील क्रांतिकारकांच्या सैन्याला मोठा धीर वाटत होता. आपण किल्ल्यावर बाहेरून हल्ला केला कीं आंतून आपले क्रांतिबांधव एकदम जोराचा उठाव करून आपणाला साथ देतील आणि बोल बोल म्हणतां किल्ला पाडाव होईल, अशी बाहेरील क्रांतिकारकांना खात्री वाटत होती.

पण किल्ल्यांत प्रकार झाला तो अगदींच विचित्र. जसे क्रांतिकारक शिपाई किल्ल्यांत होते, तसेच इंग्रजधार्जिणे चारशें शीख शिपाईही होते. हे शीख तरी ह्या प्रसंगीं आपणाला धरून राहातील अशी किल्ल्यांतील इंग्रज अधिकाऱ्यांना फारशी आशा वाटत नव्हती. तथापि शीखांनीं ह्या वेळीं इतकी शंभर नंबरी राजनिष्ठा—इंग्रजनिष्ठा दाखविली कीं इंग्रजी अधिकाऱ्यांनीं तें पाहून आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं.

क्रांतिकारक शिपायांनीं किल्ल्यावरील कंपनीसरकारचें निशाण खालीं ओढण्यासाठीं पुढें चाल केली तेव्हां शीख शिपायांनीं त्यांना साथ दिली नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्यांनीं तें निशाण जागचें हलवूंही दिलें नाहीं. उलट वरिष्ठांचा हुकूम होण्याचा अवकाश, क्रांतिकारक शिपायांचीं शस्त्रें हिसकावून घेऊन त्यांना नोकरींतून हाकलून देण्याला हे शीख सदैव एका पायावर तयार ! त्या चारशें शीखांनीं असा किल्ल्यावर इंग्रजांचा अंमल राखला.

आंतून कांहींच साथ मिळेना, तेव्हां बाहेर क्रांतिकारकांचा अगदीं नाइलाज झाला. तेवढ्यांत जनरल नील हा कृतान्तकाळ इंग्रज सेनानी बनारसपासून वाटेनें उभ्या मुलुखाची सर्वतोपरी वाताहत करीत किल्ल्याच्या बचावाला येऊन थडकला.

अखेर किल्ला कांहीं क्रांतिकारकांच्या हातीं पडला नाहीं. क्रांतिकारकांची दाणादाण उडाली. पांगापांग झाली. असें किल्ल्याला लागलेलें क्रांतिकारकांचें ग्रहण सुटतांच शीखांच्या जोरावर इंग्रज डिवचलेल्या लांडग्यांसारखे क्रांतिकारकांवर व साऱ्या अलाहाबादेवर उलटले.

कर्नल नीलच्या पुढारीपणाखालीं इंग्रजांची विजयोन्मादी सूडभावना पेटत गेली, तसे लोकही चेवले. मोठ्या लोकांचें राहो, पण लहान लहान मुलें देखील क्रांतीचा आणि स्वातंत्र्याचा जयजयकार करीत आणि कंपनी-सरकारचा जळजळीत निषेध करीत स्वातंत्र्यध्वज हातीं घेऊन रस्तोरस्तीं उघड उघड मिरवणुका काढूं लागलीं. गोरे सोजीर अशा मिरवणुकांवर निर्दयपणें गोळ्या झाडून त्या लेकरांना ठार करीत. पण मुलें जराही भीत नसत. पतंगांनीं दिव्यावर झडपा घालाव्या तशी शूरपणानें मिरवणूक पुढें चाले. गोळ्या लागून जीं ठार होतील, त्यांच्या जागीं दुसऱ्या आडवाटेनें नवी क्रांतिकारक बालसेना येऊन उभी राही. असा राजपुतांच्या जोहाराची आठवण करून देणारा निकराचा लढा अलाहाबादेंतील आबालवृद्ध जनता अनेक दिवस एकसारखा देत होती.

शिकस्त करूनही हा क्रांतिकारकांचा उठाव मोडून कसा निघत नाहीं ?.... गोरे अधिकारी आपसांत चर्चा करीत.

त्यांना कळून आलें कीं तो खाष्ट मौलवी लियाकत हुसेनखान आणि इतर पुढारी क्रांतिकारकांच्या पाठीशीं आहेत. ते भूमिगत राहून क्रांतिसंग्राम लढत आहेत.

तेव्हां कंपनीसरकारच्या अधिकाऱ्यांनीं त्या पुढाऱ्यांना पकडून देण्यासाठीं मोठमोठीं बक्षिसें लावलीं. परंतु कोणाही पुढाऱ्याला पकडून द्यायला कोणीही देशद्रोही पुढें येईना.

परंतु क्रांतिकारक तरी एकदा आपल्या देशबांधवांच्या विश्वासघातकी-पणानें फसल्यावर असा जोहार कोठवर चालविणार ? अनुकूल संधीची वाट पाहात माघार घेण्याखेरीज दुसरा इलाजच नव्हता.

मौलवी लियाकत हुसेनखान मात्र इंग्रज आणि शीख त्याच्या बहिरीससाण्यासारखे पाठीशीं लागले असतांनाही त्यांच्या हातून निसटला. तो आपल्या अनुयायांना घेऊन दिल्लीकडे निघून गेला.

जनरल नील बंड मोडण्यासाठीं राक्षसासारखा सारा मुलूख बेचिराग करीत मोकाट सुटला.

## स्वाध्याय

१. बनारस, अलाहाबाद येथील लोकांनीं क्रांति विजयी होण्यासाठीं कसकसे प्रयत्न चालविले होते ?

२. बनारस-अलाहाबादला शीखांनीं क्रांतीला अपशकुन कसा केला ?

३. अजिमगड ठाण्यांत क्रांतीचे पडसाद कसे उमटले ?

४. बनारसला क्रांति मोडून काढण्यासाठीं गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांनीं प्रथमच काय उपाय केला ? तो कितपत यशस्वी झाला ?

५. बनारसला एक 'भांगेंत तुळस' रुजलेली आढळली. तिची हकीकत सांगा.

६. शीख आणि इंग्रज लष्करी शिपायांत बनारसला परस्पर गैरसमज अचानक कसा माजला ? त्याचा परिणाम काय झाला ?

७. बनारसला इंग्रजधार्जिणेपणा गाजविणारे प्रमुख लोक कोण ? त्यांचीं नांवें सांगा.

८. अलाहाबादच्या लष्करी ठाण्याची क्रांतियुद्धाच्या वेळीं प्रारंभीं काय हालहवाल होती ?

९. तारीख ६ जूनपासून अलाहाबादच्या ठाण्याचा रंग कसा पालटला ? कोठवर पालटला ?

१०. क्रांतिकारकांच्या अलाहाबाद किल्ल्याविषयीं काय अपेक्षा होत्या ? त्या सर्वस्वी कशा फसल्या ?

११. कर्नल नीलच्या अलाहाबाद टापूंतील लष्करी दांडगाईचा परिणाम काय झाला ? क्रांति कशी भडकली ?





प्रकरण पंधरावें

# कानपूर–झांशींत मराठी राजवट



मीरत पेटलें आणि चार दिवसांनीं तारीख १४ मेला ब्रह्मावर्तांतील पेशव्यांच्या राजवाड्यांत कानपूरहून गोऱ्या लष्करी चीफ ऑफिसरचें तांतडीचें पत्र घेऊन घोडेस्वार दौडत आला.

मंगल पांड्याचें बलिदान भारतानें आजवर केलेल्या स्वातंत्र्यसंगराच्या इतिहासांत लिहून ठेवण्यासारखें अमोल आणि अमर खरें, परंतु सत्तावनी स्वातंत्र्यसंगरांतील ती एक घटना जितकी पवित्र, जितकी अपरिहार्य, तितकीच गंभीर आणि परिणामकारक ठरली हेंही खरें.

ह्या अकालीं झालेल्या क्रांतीच्या स्फोटाचे आपल्या संकल्पित स्वातंत्र्य-संगरावर काय काय दूरवर परिणाम होतील, हा एक प्रश्नच होता. नानासाहेब पेशवे आणि त्यांचे डाव्या-उजव्या हातांसारखे जिवाला जीव देणारे साथीदार

अजिमुल्लाखान, झांशीची राणी लक्ष्मी आणि तात्या टोपे, ही मंडळी ब्रह्मावर्तांत पेशव्यांच्या राजवाड्यांत हाच प्रश्न सोडवीत बसली होती.

तात्या टोपे आतां पेशव्यांच्या खानगीकडील साधा कारकून उरला नव्हता. त्या झांकल्या माणिकाची नानासाहेबांना कांहीं निमित्तानें चांगली पारख झाली होती. त्याच्यासारखा शूर, स्वामिनिष्ठ असा देवाघरचा शिपाई तोच. नानासाहेबांनीं आपल्या सैन्याच्या कौशल्यपूर्ण उभारणीचें महत्त्वाचें काम तात्यावर सोपविलें होतें. क्रांतीच्या गुप्त कट–कारस्थानांत आणि सर्व प्रकारच्या हालचालींत नानासाहेब तात्याची अवश्य सल्लामसलत घेत. रामायणांत रामाच्या निष्ठावंत सेवक हनुमानाला संकटकाळीं जें महत्त्व, तें महत्त्व तात्याला ह्या क्रांतिसंग्रामांत होतें.

जशी नानासाहेबादि क्रांतीच्या नेत्यांना मीरतच्या उठावाची उग्र समस्या चिंता उत्पन्न करीत होती, तशीच त्या समस्येनें कानपुरांत इंग्रज लष्करी चीफ ऑफिसर सर ह्यूज व्हीलर ह्या म्हाताऱ्यालाही मोठी चिंता उत्पन्न केली होती. व्हीलरची चिंता किंबहुना नानासाहेबांच्या चिंतेपेक्षां गंभीर होती. कानपूरच्या लष्करी ठाण्यावर तीन हजार हिंदी सैनिक होते. गोऱ्या गोलंदाज सोजिरांचा तोफखाना होता. शिवाय शंभर इंग्रज शिपाईही होते.

व्हीलरला प्रश्न असा पडला कीं मीरतसारखे जर कानपूरचेही हिंदी शिपाई बिथरले आणि आपल्या इंग्रजांवर शस्त्र उगारून उठले, तर त्या आगपाखडींत इंग्रजांचा बचाव कसा व्हायचा ?

तशी वेळ येऊं नये पण आलीच, तर प्रसंगाला तोंड देण्याची तयारी करणें व्हीलरला भाग होतें. त्यानें कानपुरांतील साऱ्या इंग्रज कुटुंबांसाठीं प्रथम शिपायांच्या बराकींमागें गंगेच्या कांठीं सर्वतोपरी सुरक्षित अशी जागा शोधून काढली. इंग्रज लोक भराभर त्या जागीं राहायला गेले. नंतर लगेच व्हीलरनें ब्रह्मावर्ताच्या राजाला विनंतिपत्र लिहिलें, ‘ कृपा करून आपण आपलें सैन्य घेऊन कानपुरांत या आणि आमचें रक्षण करा. ’

तें पत्र घेऊन तो जासूद त्याच दिवशीं ब्रह्मावर्ताला गेला होता.

तें पत्र वाचून नानासाहेब, राणी लक्ष्मीबाई, अजिमुद्दिन ह्यांना नवल वाटलें. हसूं आलें. तात्यालाही त्याचें नवल वाटलें. पण हसूं मात्र आलें नाहीं.

"ठीक आहे. ह्या पत्राचा मी अवश्य विचार करून मला काय करतां येईल तें इंग्रजांच्या रक्षणासाठीं जरूर करतों." अशा आशयाचें उत्तर लिहून नानासाहेबांनीं लगेच त्याच जासुदाहातीं रवाना केलें. ती एक इष्टापत्तिच नानासाहेबांवर ओढवली.

जासूद माघारा गेला आणि मग मंडळींत प्राप्त प्रसंगाविषयीं पुन्हा खल सुरू झाला.

"सुभेदारांची सल्ला घेतली पाहिजे." नानासाहेब म्हणाले. सुभेदार टिकासिंग हा कानपुरांतील क्रांतिकारकांचा नेता. लष्करी सल्लामसलतींच्या बाबतींत नानासाहेब तात्यासारखाच सुभेदाराला मान देत.

सुभेदाराचें नांव निघायला आणि सुभेदार, ज्वालाप्रसाद, वगैरे पुढारी मंडळी कानपूरहून तेथें येऊन पोचायला एक गांठ पडली.

सर्वांचीं बराच वेळ गुप्त खलबतें झालीं आणि अखेर निर्णय ठरला. पेशव्यांनीं आपलें तीन हजार सैन्य बरोबर घेऊन कानपूरला व्हीलरच्या विनंतीला मान देऊन अवश्य जावें.

तीं गुप्त खलबतें आटोपून राणी लक्ष्मी जशी आली तशी बोभाटा न करतां माघारी झांशीला गेली. ठरल्याप्रमाणें नानासाहेब आपलें सैन्य घेऊन दोन तीन दिवसांतच कानपूरला रवाना झाले. व्हीलरला मोठा धीर आला. त्यानें नानासाहेबांचे आभार मानले आणि इंग्रजांचा खजिना, दारूखाना, ह्या दोन अतिशय महत्त्वाच्या बाबींचें संरक्षण त्यांच्यावर सोपविलें.

जूनची पहिली तारीख उजाडेपावेतों कानपुरांत जिकडे तिकडे शांत होतें. निदान व्हीलरला आणि त्याच्या सहकारी गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांना तरी शांतसें दिसत होतें.

त्या दिवशीं सायंकाळीं नानासाहेब पेशवे आपले बंधु बाळासाहेब, वजीर अजिमुल्लाखान, सेनापति तात्या टोपे, ह्यांना घेऊन गंगातीरीं आले. सुभेदार टिकासिंग आणि इतर पुढारी मंडळी अगोदरच त्या जागीं येऊन वाट पाहात उभी होती. गंगेच्या तीरीं एक नाव उभी होती.

सारेजण त्या नावेंत बसून गंगापात्रांत दूरवर गेले. तेथें पवित्र गंगाजल हातीं घेऊन गंगामाईच्या साक्षीनें त्यांचे आपसांत शपथविधि झाले आणि नाव माघारीं आली.

दुसरा दिवस गेला. तिसरा दिवस गेला. जूनची चार तारीख उजाडली. त्या दिवशीं रात्रीच्या वेळीं बंदुकीचे तीन बार कानपुरांत सर्वांना ऐकूं आले. तो उठावाचा संकेत होता. लगेच त्याच क्षणीं रक्तपात, जाळपोळ, कत्तल असलें रौद्र स्वरूप धारण करणारी क्रांति कानपुरांत तळपत अवतरली. नानासाहेब पेशव्यांच्या प्रासादापाशीं त्यांच्या तीन हजार सशस्त्र सैनिकांची शिस्तवार रीघ लागली. सुभेदार टिकासिंग आणि त्याच्या मागोमाग त्याचे हजार घोडेस्वार इंग्रजांच्या बंगल्यांना आगी लावीत आणि बराकीबराकींतून सैनिकांना जागे करीत दौडूं लागले.

दुसरा दिवस उजाडला. नबाबगंजांतील पेशव्यांच्या त्या राहात्या राजवाड्यांत नानासाहेब पेशवे समारंभपूर्वक राजे निवडले गेले. राजानें आपलें राजमंडळही नेमलें. सुभेदार टिकासिंगाची घोडदळाचा सेनापति म्हणून नेमणूक झाली. हिंदवीच्या त्या नव्या राजाची हत्तीवरून कानपूरभर थाटानें मिरवणूक काढण्यांत आली. तेव्हां कोठें व्हीलरचे डोळे उघडले कीं आपण ह्या भयंकर माणसाला मदतीसाठीं ब्रह्मावर्ताहून बोलावण्यांत घोडचूक केली. चोराच्या भयानें घेतलें रान, तेथें भेटला मुसलमान, त्यानें कापले दोन्ही कान, तशांतली म्हाताऱ्या व्हीलरची फसगत झाली.

पेशवे राजे आतां आपलें राज्य इंग्रजांच्या मगरमिठींतून सोडविण्यासाठीं युद्धाला उभे राहिले हें तर खरेंच. पण त्यांनीं आरंभीं त्या शत्रूवरदेखील अंधारांत घाव घातला नाहीं. त्यांनीं आपली व्यूहरचना मनाजोगी

झाल्यावर लगेच व्हीलरला जासूद पाठवून आगाऊ इषारा दिला, " आम्ही आतां चढाई करणार आहों. आगाऊ कळवीत आहों. तयार राहा. "

व्हीलरनेंही आपल्या बाजूची तयारी केली. तो मुरलेला शूर सेनानी होता. डरला नाहीं.

पेशवे राजे इंग्रजांशीं लढायला उभे राहिलेले पाहातांक्षणीं हजारों नागरिकही हातीं लागलें तें शस्त्र, निदान लाठी काठी घेऊन स्वातंत्र्याचे सैनिक म्हणून राजाच्या पाठीशीं स्वयंस्फूर्तीनें उभे राहिले. इंग्रजांचा निःपात करण्याची संधि आपणाला मिळावी, ही प्रत्येकाची अंतरींची इच्छा.

शिवाय ठिकठिकाणचे अनेक राजे, सरदार, जहागिरदार पेशव्यांच्या निशाणाखालीं उभे राहून इंग्रजांशीं स्वतःच्या स्वातंत्र्यासाठीं लढण्याकरितां भराभर सज्ज झाले होते.

एवढ्या प्रचंड लोकशाहीपुढें बिचाऱ्या मूठभर इंग्रजांचा काय निभाव लागणार ! ते त्या अनिवार्य संकटाला धैर्यानें तोंड देण्याची शिकस्त करीत होते. परंतु कोठेही त्यांचा निभाव लागेना.

गांवांतील इंग्रजी सत्ता नामशेष केल्यावर क्रांतिसेनेनें तारीख बारा जूनला किल्ल्यावर चढाई केली. तेव्हां तर इंग्रजांत केवळ हाहाकार उडाला. कोठेंही त्यांना वर डोकें करायला अवसर म्हणून सापडेचना !

तरीदेखील झालें हें कांहींच झालें नाहीं. व्हायचें तें पुढेंच होतें. आणखी दहा दिवसांनीं जूनच्या तेविसाव्या तारखेला भारतांतील इंग्रजी राजवटीचीं शंभर वर्षें भरत होतीं. बरोबर शंभर वर्षांपूर्वी ता. २३ जून रोजीं प्लासीच्या लढाईंत इंग्रज विजयी झाले आणि भारतांत त्या दिवशीं इंग्रजी साम्राज्याची स्थापना झाली. भारत इंग्रजांचें अंकित राष्ट्र झाला. ज्योतिष्यांनीं असें भविष्य वर्तविलें होतें कीं शंभर वर्षांनीं भारतांतील इंग्रजी राजवट नष्ट होईल आणि भारत पुन्हा स्वतंत्र होईल.

तीं शंभर वर्षें तारीख २३ जून १८५७ रोजीं पूर्ण होत होतीं. त्या दिवशीं भारत स्वतंत्र होणारच, असा सर्व क्रांतिकारकांचा ज्योतिषावर विश्वास होता. मायभूमीला इंग्रजांच्या गुलामगिरींतून सोडवून स्वतंत्र करण्याचें महद्भाग्य आपल्या वांट्याला येऊं घातलें आहे, ह्या आनंदानें आणि अभिमानानें बेहोप झालेल्या क्रांतिकारकांनीं त्या दिवशीं इंग्रजांवर अभूतपूर्व चढाई केली. तीन दिवस प्राणपणानें झगडल्यावर इंग्रजांना पराभव कबूल केल्याचें पांढरें निशाण हातीं घेऊन जूनच्या पंचवीस तारखेला क्रांतिकारकांना शरण जाणें भाग पडलें. इंग्रज ह्याप्रमाणें शरण आलेले पाहातांच नानासाहेबांनीं लढाई लगेच थांबविली आणि व्हीलरला ताबडतोब चिठी पाठविली, "व्हिक्टोरिया राणीच्या प्रजाजनांपैकीं ज्यांचा खरोखर डलहौसीच्या साम्राज्यविषयक धोरणाशीं संबंध नसेल आणि जे शस्त्रें खालीं ठेवून शरण येतील, त्यांना सुरक्षितपणें अलाहाबादेला पाठविलें जाईल."

मरण कोणाला पाहिजे असतें? सर्व इंग्रजांनीं त्याच दिवशीं शस्त्रें खालीं ठेवलीं. सर्व बंदुका आणि तोफा क्रांतिकारकांच्या सेनापतीच्या हवालीं केल्या आणि अलाहाबादला जाण्याची नम्रतापूर्वक इच्छा दर्शविली.

पुढील तयारी व्हायला उशीर लागला नाहीं. नानासाहेबांच्या हुकुमानुसार सेनापति तात्या टोपेनें त्याच रात्रीं गंगेवर चाळीस नावा तयार ठेवण्याची व्यवस्था केली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां चाळीस बोटी इंग्रज निर्वासितांना घेऊन गंगेच्या सतीचावडा घाटावरून सुटल्या.

पण!...बोटी सुटल्या मात्र आणि नदीतीरीं इतका वेळ अगदीं शांत उभे असलेले क्रांतिकारक शिपाई तोफा, बंदुका, तरवारी, कुकऱ्या अशा शस्त्रास्त्रांसह 'हर हर महादेव'ची घनगर्जना करीत गंगेंत भराभर उड्या घेऊन इंग्रजांवर तुटून पडले. त्यांतल्या सव्वाशें इंग्रज बायकामुलांना तेवढें त्यांच्या मरणभयाच्या किंचाळ्यांनीं द्रवून जीवदान देण्यांत आलें. तशीच एक बोट चुकून निसटली, तिच्यांतून तीन चार गोरे बचावले. बाकीच्या एकूणचाळीस बोटींतील इंग्रजांच्या रक्तानें गंगेचें पाणी लाल झालें.

दोन दिवसांनंतर तारीख २८ जून रोजीं श्रीमंत नानासाहेब पेशवे राजांचा भव्य दरबार भरला. त्या समारंभाला सर्व प्रमुख क्रांतिकारक हजर होते. दरबारांत माननीय क्रांतिकारकांचा यथोचित सन्मान झाला. दिल्लीच्या बादशाहाच्या नांवानें एकशेंएक तोफांची सलामी देण्यांत आली. त्या खालोखाल पेशवे राजांना एकवीस तोफांची सलामी मिळाली. अशा राजोपचारी थाटानें श्रीमंत पेशवे राजांचा राज्यारोहणसमारंभ विधिपूर्वक साजरा झाला आणि पेशवे राजांची स्वारी राजशाही लवाजम्यासह ब्रह्मावर्ताला रवाना झाली.

आणि झांशीची राणी लक्ष्मी ?

राणी जी ब्रह्मावर्ताहून संकेत ठरवून आली, ती ह्या क्रांतीचाच निर्णय घेऊन आली. त्याप्रमाणें ज्या दिवशीं कानपूर उठलें, त्याच दिवशीं झांशीही उठली.

झांशींतील इंग्रजांना अगोदर ह्याचा कांहीं सुगावा लागला होताच. राणीचीं – राणीनें प्रयागच्या पंड्यांना पाठविलेलीं आणि तिकडून राणीला आलेलीं – कांहीं पत्रें इंग्रजांच्या हातीं पडलीं होतीं. पण राणी अशी दूरवर तीर्थी-क्षेत्रीं पंडे-उपाध्ये-बैरागी अशांनादेखील ह्या क्रांतीच्या कार्यांत गोंवून घेणार, इतकें खोलवर क्रांतीच्या कारस्थानाचें जाळें ती पेरणार, ह्यावर इंग्रजांचा विश्वास बसला नाहीं. अडाणी बायको माणूस, चिडून कांहींतरी धडपड करील, असाच त्या पत्रांचा अर्थ इंग्रजांनीं घेतला. तिकडे लक्षच दिलें नाहीं. झांशींतील गोऱ्या अधिकारी लोकांची कत्तल करण्याचा क्रांतिकारकांचा बेतही अशा एका सापडलेल्या पत्रांत आढळला होता.

तो बेत ऐकून तो इंग्रज अधिकारी तेव्हां उपहासानें हसून आपल्या सहकाऱ्यांना आढ्यतापूर्वक म्हणाला होता, ‘ इंग्रज अधिकाऱ्यांची कत्तल करायला ते बावळट हिंदी लोक अथवा शेणामेणाचे पुतळेच आहेत जसे कांहीं ! ’

पण जूनच्या चार तारखेला जेव्हां झांशीचे ते बावळट शेणामेणाचे शिपाई खरोखरच उठले आणि शहरांतील इंग्रजांची टिपून कत्तल करूं लागले, तेव्हां इंग्रजांचे डोळे उघडले.

पण फार उशिरां डोळे उघडले. तोंवर झांशीच्या किल्ल्यावरचें कंपनी-सरकारचें निशाण नाहीसें होऊन त्या जागीं क्रांतिकारक स्वतंत्र भारताचा विजयध्वज फडकत असतांना त्या इंग्रजांना उघड्या डोळ्यांनीं पाहावा लागला.

पाऊणशें इंग्रज, बारा बायका आणि सत्तावीस अर्भकें ह्यांच्या रक्तानें रंगलेल्या झांशीवर तेथील क्रांतिकारक शिपाई आपला विजयध्वज फडकवून साऱ्या झांशीला घोषणापूर्वक ग्वाही देत आनंदानें शहरभर संचार करीत होते.

'खुल्क खुदाका. मुल्क बादशाहाका. अंमल राणीसरकारका.'

## स्वाध्याय

१. मीरत पेटलें, त्या सुमाराला ब्रह्मावर्तांत क्रांतिनेत्यांचा काय विचारविनिमय चालला होता?

२. तात्या टोपेची आतां काय हालहवाल होती?

३. सेनापति व्हीलरनें नानासाहेबांना काय विनंतिपत्र पाठविलें? तसें पत्र पाठविण्यांचा प्रसंग त्यांच्यावर कां आला?

४. व्हीलरच्या पत्राची नानासाहेबांवर इष्टापत्ति कशी ओढवली?

५. जूनच्या चार तारखेचें (सन १८५७) कानपूर वर्णन करा.

६. 'तारीख ५ जून सन १८५७ रोजीं कानपुरांत भारताचें हिंदवी स्वराज्य स्थापन झालें.' ह्या विधानाचें ह्या प्रकरणांतील माहितीच्या आधारें विवरण करा.

७. म्हाताऱ्या व्हीलरची कानपुरांत एकंदरींत फसगत झाली काय? कशी?

८. भारताचे पेशवे रा[illegible] ईचें वर्णन करा.

९. तारीख २३ जून १८५७ ह्या दिवसाचें क्रांतिकारकांना वाटणारें महत्त्व कारणें देऊन वर्णन करा.

१०. विजयी पेशवेराजानें व्हीलरला काय चिठी पाठविली ?

११. संती चावडा घाटावरील चाळीस बोटींची शोककथा सांगा.

१२. पेशवेराजाच्या दरबाराचे वर्णन करा.

१३. झांशीची राणी ब्रह्मावर्तावरून कोणता संकेत ठरवून माघारीं आली असावी ? कशावरून ?

१४. 'खुल्क खुदाका. मुल्क बादशाहाका. अंमल राणीसरकारका.' ह्याचें स्पष्टीकरण करा.





प्रकरण सोळावें

# अयोध्येंतील जय



अयोध्येचें राज्य हें तर असंतोषाचें माहेरघर. इंग्रजांनीं अयोध्येचा नबाब आणि त्याबरोबरच अयोध्येच्या पोटांतील सारे जहागीरदार तालुकदार भिकेला लावलेले. असे धनी गांजलेले आणि रयतही गांजलेली. मग साऱ्या देशभर क्रांतीचा भडका उडत असतांना अयोध्या तेवढी हात जोडून स्वस्थ बरी बसेल !

परंतु अयोध्येंतील नबाब, जहागिरदार, तालुकदार आणि रयतही स्वस्थ नव्हते. तसेच सात हजार मैलांवरून इतक्या दूर भारत लुटून गबर व्हायला आलेले इंग्रजही स्वस्थ नव्हते. शिपाई उठावाची तयारी करीत आहेत अशी कुणकुण इंग्रज अधिकाऱ्यांना नक्की लागतांक्षणीं त्यांनीं सपाट्यासरशी लखनौची सातवी पलटण निःशस्त्र करून मोडून टाकली. कानपूरच्या

म्हाताऱ्या सर ह्यूज लॉरेन्सचा भाऊ सर हेन्री लॉरेन्स हा तेव्हां लखनौला चीफ ऑफिसर होता. त्यानें अयोध्येंत शांतता राखण्याच्या इराद्यानें तारीख १२ मेला मोठा दरबार भरविला. जमीनदार, जहागिरदार, तालुकदार, मुकाटपणें खालीं माना घालून दरबारांत हजर होते. लॉरेन्सचें शांतिपुराण त्या साऱ्यांनीं बाहेरील वरवरच्या शांतपणानें ऐकून घेतलें. मानाही डोलवल्या. परंतु अंतरंगांत क्रांतीचा अंगार धगधगत होता.

तो दरबार पार पडला. आणि दुसऱ्याच दिवशीं मीरत पेटल्याची बातमी येऊन थडकली. तोंच लगेच तिसऱ्या दिवशीं दिल्ली पडून भारत स्वतंत्र झाल्याचा बादशाहाचा जाहीरनामाही लखनौमध्यें येऊन फडकला.

तेव्हांमात्र सर हेन्री लॉरेन्सला वाटूं लागलें कीं अयोध्येंतील असंतोष काबूंत ठेवणें हें काम आतां सोपें उरलेलें नाहीं. मग त्याची संरक्षणासाठीं धावपळ सुरू झाली. नेपाळच्या राजाकडेही मदतीसाठीं विनंतिपत्र घेऊन दूत रवाना झाले. बातमीदार रोज ठिकठिकाणच्या उठावाच्या बातम्या आणीतच होते. त्या बातम्यांवरून अंदाज बांधून त्या मानानें इकडे इंग्रजांची तयारी सुरू होती.

तोंच मेच्या ३० तारखेला बातमी आली कीं आज रात्रीं लखनौमध्यें बंडाचा वणवा पेटणार.

बातमी आणणारा नेहमींचाच बातमीदार. इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्याची ‘ लांडगा आला रे लांडगा आला ’ अशी थट्टा चालविली.

पण त्या रात्रीं नऊ वाजतां खरोखरच लांडगा आला. भोजनगृहांत इंग्रजांचें जेवण चालू होतें. तोंच गोळीबाराची सूंऽ सूंऽ गर्जना कानीं येऊं लागली. मग कोठचें जेवण आणि कोठचें काय. साऱ्यांना पळतां भुई थोडी झाली. रात्रभर सारा गोंधळ.

उजाडलें. लॉरेन्स मोठ्या दिमाखानें क्रांतिकारकांचा बींमोड करायला निघाला. पण शिपायांना परेड मैदानावर बोलावून त्यांना तो क्रांतिकारकांवर चालून जाण्याची आज्ञा देतो तों काय! शिपाई शस्त्रास्त्रें सरसावून निघाले.

पण कोठें? ते जे गेले ते सरळ क्रांतिसेनेला जाऊन मिळाले! पुरते दांत पाडावे तशी इंग्रजांची अवस्था झाली. शिपायांना हो हो करतां करतां पुरे वाट.

त्यांतच आणखी पेटत्या आगींत गवताच्या पेंढीची भर पडावी तशी बातमी लष्करांत उठली कीं शिपायांना रोजच्या जेवणासाठीं जो आटा दिला जातो, त्यांत हाडांची पूड मिसळलेली असते. तें ऐकून तर खवळलेले शिपाई अधिकच खवळले. अखेर त्यांच्या समजुतीसाठीं इंग्रज अधिकाऱ्यांनीं तीं आट्याचीं शेकडों पोतीं गंगेंत नेऊन ओतलीं.

तरीही बंडाळीचा वणवा भडकायचा तो भडकलाच. क्रांतिकारक आणि इंग्रजी लष्कर ह्यांची हाणामारी ठिकठिकाणीं दिवसांमागून दिवस एक-सारखी सुरूच होती. गोरे लोक लढत होते, पडत होते, पळत होते. कांहीं इंग्रज पळून रायकोट, मितवाली येथील जमीनदारांच्या आसऱ्याला गेले. ते जमीनदार सावध व धूर्त. हात राखून धर्म करणारे. क्रांतीला ते अनुकूल होते खरे. परंतु क्रांति फसली तर? इंग्रजी राजवटच पुन्हा अधिक बळकट होऊन मानगुटीला बसली तर? अशा प्रसंगीं वशिला उपयोगी पडावा असें पुढचें धोरण राखून त्या जमीनदारांनीं अनेक इंग्रजांना आसरा दिला.

लखनौपासून एकावन्न मैलांवर सीतापूरचें ठाणें होतें. तेथले शिपाईही उठले. ते थेट फर्रुखाबादेवर चालून गेले. कारण फर्रुखाबादच्या किल्ल्यांत इंग्रज दडून बसले होते. किल्ल्यावर हल्ला करून शिपायांनीं आंतील साऱ्या इंग्रजांना कापून काढलें. त्यांचे बंगले जाळले. त्यांची मालमत्ता लुटली. सिकोरा, गोंडा, मेलापूर, फैजाबाद अशीं ठाण्यांमागून ठाणीं क्रांतिकारक शिपाई मोकळीं करीत सुटले.

त्या सर्व ठाण्यांत फैजाबाद ठाणें फारच महत्त्वाचें. तेथें इंग्रजांचा कडेकोट बंदोबस्त होता. कारण तें मुरब्बी क्रांतिकारक मौलवी अहंमदशाहाचें फैजाबाद. तेथें मौलवीनें चळवळीचे सुरुंगांवर सुरुंग पेरून ठेवलेले. तेच सुरुंग आतां भराभर उडूं लागले. क्रांतिकारकांनीं तुरुंग फोडून

मौलवीला मोकळा केला. इंग्रजांनीं त्याला पकडून प्रथम बंडखोरपणाबद्दल फांशीची शिक्षा सुनावली होती. पण त्याला फांशी दिल्यानें रयत फारच खवळेल, ह्या भीतीनें मग ती शिक्षा रद्द करून नुसती जन्मठेपेची तुरुंगवासाची शिक्षा केली गेली. तो मौलवी पिंजऱ्यांतून सिंह सुटावा तसा मोकळा सुटतांच क्रांतीला एकदम जोर चढला. फैजाबादेंत इंग्रजी सत्तेचें नांवही मौलवीनें बाकी ठेवलें नाहीं. तो मूळचा बडा जमीनदार खरा. परंतु आतां आपलें सर्वस्व मायभूमीच्या दास्यविमोचनासाठीं अर्पण करून निःस्वार्थी नंगा फकीर बनलेला अवलिया तो. मौलवी बोले आणि रयत चाले अशी अवस्था आतां सगळीकडे जारी होती. इंग्रजांचा त्याच्यापुढें टिकाव लागेना. ते मारतां मारतां, मरतां मरतां, बोटींतून, गाडींतून, पायीं, ज्यांना जसा रस्ता फुटेल तसे जीव मुठींत घेऊन पळत सुटले.

सुलतानपुर, सलोनी, अशीं सर्व राहिलींसाहिलीं लष्करी ठाणींही क्रांतिसेनेनें दिलेल्या धडकांसरशीं धडाधड कोसळून पडलीं. तारीख ७ जूनपावेतों अयोध्येच्या नबाबांचें राज्य बहुतेक मुक्त झालें. त्यांत इंग्रजी अंमलाचीं जळमटें कुठेंही सहसा ध्यानीं घेण्याजोगीं बाकी उरलीं नाहींत. राहातां राहिली लखनौची रेसिडेन्सी. तो टापूही वेढण्याची तयारी क्रांतिसेनेनें मौलवी अहंमदशाहाच्या नेतृत्वाखालीं धडाक्यानें चालविली.

## स्वा ध्या य

१. अयोध्येचें राज्य हें असंतोषाचें माहेरघर कसें ?
२. लॉरेन्सच्या दरबारांत काय दिसलें ? त्यावरून तो कसा फसला ?
३. ‘ आज बंडाचा वणवा पेटणार ’ ह्या बातमीची गोऱ्या अधिकाऱ्यांना थट्टा कां करावीशी वाटली ?
४. ‘ त्या रात्रीं नऊ वाजतां खरोखरचा लांडगा आला. ’ तो कसा ?
५. ‘ पेटल्या आगींत गवताच्या पेंढीची भर ’ कोणती पडली ?
६. सीतापूरच्या उठावाचा काय परिणाम झाला ?
७. मौलवी अहंमदशाहाला इंग्रज कसे वचकले ?





प्रकरण सतरावें

# दिल्लीचा पेंच



"आम हिंदु-मुसलमान भाई हो ! आम्हीं केवळ धर्मरक्षण करण्यासाठीं तें आमचें परमपवित्र धर्मकर्तव्य म्हणून लोकगंगेला येऊन मिळालों आहों. ह्या कालांत जे कोणी भीतीनें अंगचुकारपणा करतील, त्यांना शरमेनें खालीं मान घालावी लागेल आणि इंग्लंडशीं राजनिष्ठ राहिल्याबद्दल लखनौच्या राज्यकर्त्यांना जें फळ भोगावें लागलें तेंच त्यांनाही भोगावें लागेल. आतां ह्यापुढेंही ह्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत हिंदु-मुसलमानांनीं हातांत हात घालून त्यांचे सन्मान्य पुढारी आज्ञा करतील त्याप्रमाणें वागावें आणि देशांत सुव्यवस्था ठेवण्याला मदत करावी. गरीब रयतेला सुखी आणि समाधानी ठेवण्यासाठीं मनापासून झटावें. तसेंच ज्याला ज्याला हा जाहीरनामा वाचायला सापडेल, त्यानें त्यानें त्याचा तर्जुमा

करून तो पुष्कळांना वाचतां येईल अशा रहदारीच्या प्रसिद्ध ठिकाणीं चिकटवावा. तसें करतांना कोणालाही त्याचा थांगपत्ता लागूं देऊं नये. ....”

(सही) बहादुरशाह

दिल्ली. ता. ११।५।१८५७. दिल्लीचा बादशाह.

मीरतच्या क्रांतिकारक शिपायांच्या उतावळ्या परंतु अजोड राष्ट्रभक्तीमुळें आणि स्वधर्माभिमानामुळें कां होईना, पण दिल्लींत त्या दिवशीं हा शुभ चमत्कार घडून आला. राजधानी दिल्ली इंग्रजी सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. इंग्रजांच्या जुलमी आक्रमक कारभारामुळें आपल्या बादशाही वैभवसर्वस्वाला मुकून अज्ञातवासांत क्षुद्रतेनें जिणें खितपत पडलेल्या बादशाहा बहादुरशाहाला पुन्हा दिल्लीच्या बादशाही तख्तावर स्थापना करण्यांत आलें. बादशाहा म्हणून त्याच्या नांवाची सर्वत्र द्वाही फिरली. आणि स्वातंत्र्यसंग्रामाचें नेतृत्व बादशाहानें पत्करून आपल्या आम प्रजेसाठीं वरचा स्फूर्तिदायक जाहीरनामा काढला.

अनेक कारणांमुळें भविष्यकाल भारताच्या सत्तावनी स्वातंत्र्यसंग्रामाला प्रतिकूल ठरला त्याला इलाज नाहीं. पण हा आरंभींचा दिल्लीची बादशाही पुरुनज्जीवित करण्याचा प्रयत्न हाही कांहीं पोरखेळ नव्हता. भारतांतील अनेक राजेरजवाडे त्या दिवशीं बादशाही तख्ताला अभिवादन करून बादशाहाचे मांडलिक ह्या नात्यानें बादशाहाला नजराणे नजर करण्यासाठीं जातीनें अथवा आपल्या प्रतिनिधीमार्फत हजर होते.

नानासाहेब पेशवे देखील ब्रह्मावर्ती स्वतःला राजा म्हणून राज्याभिषेक करून घेतांना दिल्लीच्या बादशाहाला एकशेंएक तोफांची सलामी देऊन बादशाहाच्या ठायींची आपली राजनिष्ठा प्रगट करायला चुकले नाहींत.

दिल्लीहून वर सांगितलेला बादशाही जाहीरनामा क्रांतिकारकांच्या प्रेरणेनें जाहीर झाला आणि क्रांतिकारक शिपाई सर्व बाजूंनीं स्वातंत्र्यसंगर बादशाहाच्या नांवावर यशस्वीपणें चालविण्याच्या तयारीला लागले. मुख्य

गरज शस्त्रास्त्रांची. कारण इंग्रजी युद्धनीति सुधारलेली. त्यांचीं शस्त्रास्त्रें, त्यांची शिस्त, त्यांची लष्करी कवाईत, देशीपेक्षां श्रेष्ठ होती. अशा इंग्रज शत्रूशीं सामना द्यायचा तर चांगलीं शस्त्रास्त्रें, दारूगोळा, तोफा असें सर्व साहित्य उत्तम आणि अमूप पाहिजे. त्यासाठीं दिल्लींत अनेक कारखाने निघाले. त्या कारखान्यांवर देखरेख करण्यासाठीं दर्दी फ्रेंचांची नेमणूक करण्यांत आली होती.

इंग्रजही इरेला पेटून क्रांतिकारकांचा बींमोड करण्याची दिल्लींतही अगदीं प्राणपणानें तयारी करीत होते. दिल्लीच्या तटालगतच डोंगर-टेकड्यांचा जो भाग, त्याची दुसरी बाजू चार मैल लांबीपावेतों यमुना नदीला भिडलेली होती. तो उंचवट्याचा प्रदेश असल्यानें लष्करी दृष्टीनेंही ठाण मांडून बसायला फार सोयीचा होता. इंग्रजांनीं त्या प्रदेशाला 'रिज' असें नांव दिलें होतें. ह्या रिजच्या पाठीशीं यमुनेचा कालवा तुडुंब खळखळ वाहात होता. त्यामुळें मे-जूनच्या जळत्या भाजत्या उन्हाळ्यांतही त्यांना पाण्याची मुळींच वाण नव्हती.

दुसरें; नाभा, झिंद, पतियाळा ह्या दोस्त शीख राजांकडून सैन्य, अन्नधान्य व इतर हरप्रकारचें साहित्य त्या जागीं अगदीं बिनबोभाट येऊन पोचत असे.

प्लासीच्या लढाईची शंभरी निकराच्या लढाईनें कानपुरांत क्रांतिकारकांनीं साजरी केलेली आपण पाहिली; तशीच वेळ दिल्लींतही त्या दिवशीं आली. त्यापूर्वींही क्रांतिकारक आणि इंग्रज ह्यांच्यांत उभयपक्षीं दबा धरून लढत चालूच होती. दोन्ही बाजूंना चिकाटीच्या शूरांची वाण नव्हती. रोजच्या लढाईंत गोरे सोजीर कदाचित कवाइती शिस्तींत सुधारलेलीं शस्त्रास्त्रें घेऊन लढत असल्यामुळें थोडे बळी पडत असतील. आणि देशी शिपाई त्या मानानें अधिक बळी पडत असतील. पण त्या शिपायांत क्रांतिकारकांचा रोज चोहींकडून नवा भरणा होत होता. क्रांतिगंगेचें पाणी असें तांब्ये-

कळशा-पखाली भरून उपसून फेंकलें गेलें, तरी तिचा पूर दिवसेंदिवस वाढतच होता. गोऱ्या शिपायांचें सांठवणी पाणी मात्र कुडचा कुडचा कमी होतां होतां रोज आटत चाललें होतें.

मनुष्यबळाची आणि दळणवळणाची अशी अडचण, आणि शिवाय तो दिल्लीचा उन्हाळा. थंड हवेंत वाढलेले नाजुक गोऱ्या कातडीचे इंग्रज त्या उन्हाळ्यांत नुसते करपून निघत होते. १५ जुलैपावेतों अवघ्या दोन महिन्यांत दोन गोरे सेनापति दिल्लीच्या उन्हाळ्याच्या झळीनें करपून करपून मेले. गोरे शिपाई तर अधिकच मेले असतील. तिसरा सेनापति रीड देखील तसाच करपून मरायचा. पण तो मरण चुकविण्यासाठीं राजीनामा देऊन हिमालयाच्या थंड हवेंत विश्रांतीकरितां जाऊन बसला आणि त्याच्या जागीं ब्रिगेडियर जनरल विल्सन सेनापति झाला.

किल्ल्याला इंग्रजांचा वेढा तर मजबूत होता. पण आंतले क्रांतिकारक शिपाई गोऱ्या लष्कराला पुरून उरत होते.

आपलें यशदेखील पराजयाइतकेंच आपणांला दिवसेंदिवस महाग पडत आहे, असें कबूल करण्याचा बांका प्रसंग इंग्रजांवर आला.

असा हा शेवट न पावणारा लढा आणखी किती दिवस लढायचा? हा एक गंभीर प्रश्न इंग्रजांपुढें राक्षसासारखा आ वासून उभा होता.

### स्वाध्याय

१. दिल्लींत मोगल बादशाही पुन्हा प्रस्थापित करण्याचा प्रयत्न कसा झाला ? तो कितपत यशस्वी झाला ?

२. तेव्हांच दिल्लींत शस्त्रास्त्रांचे आणि दारूगोळ्यांचे अनेक कारखाने कां निघाले ?

३. 'रिज'चें वर्णन करून इंग्रजांच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व सांगा.

४. दिल्लींतील 'शेवट न पावणारा' लढा कसा होता ?





प्रकरण अठरावें

# पेशव्यांचें कानपूर पडलें !



भारतभर क्रांतीच्या खवळलेल्या अथांग आवर्तांत इंग्रजांना जरा पाय टेकण्यापुरती उसंत मिळाली अशी अलाहाबादेंत. तीही शीख शिपाई त्यांच्या बाजूला होते म्हणून.

राजधानी कलकत्त्यांत इतक्या दूर राहून क्रांतिकारकांशीं टक्कर देणें कॅनिंगला फार गैरसोयीचें वाटूं लागलें. म्हणून तो आपली राजधानी तात्पुरती अलाहाबाद येथें थाटून येऊन राहिला.

परंतु कलकत्ता सोडून अलाहाबादला आल्यानें कानपुरांत इंग्रजांचें सफा कापलें गेलेलें नाक कांहीं बरें होत नव्हतें. कानपूरचा पराभव कॅनिंगलाही मरणमोलानें डांचत होता. जनरल नील दिल्ली-अंबाला-

कानपूरच्या टापूंत सर्वत्र नुसतें खांडववन जाळीत सुटला होता. तरीही क्रांतिकारकांचा जोर कांहीं केल्या ओसरत नव्हता.

शेवटीं कॅनिंगनें नीलच्या जागीं हॅवलोकची नेमणूक केली. हा ताज्या दमाचा कर्दनकाळ हॅवलॉक नीलच्या सवाई दुष्ट, बेडर, निर्दय व मुसंडीबाज होता. तो जो अलाहाबादेहून सहा तोफा, हजार निवडक गोरे सोजीर आणि साथीला दीडशें शीख शिपाई घेऊन निघाला, तो वाटेनें गांवेंचीं गांवें समूळ उध्वस्त करीत कानपुराकडे चालला.

त्याच वेळीं मेजर रेनो ह्याच्या हाताखालीं गोऱ्या सोजिरांची एक तुकडी फत्तेपूरच्या रोखानें क्रांतिकारकांच्या तिकडील उठावाचा नायनाट करण्यासाठीं चालली होती. ही बातमी नानासाहेबांना ब्रह्मावर्तांत कळली. लगेच त्यांनीं टिकासिंग आणि ज्वालाप्रसाद ह्यांना बरोबर सैन्य देऊन फत्तेपूरच्या रक्षणाला पाठविलें. परंतु तेवढ्यांत विल्सनच्या सैन्याची रेनोच्या सैन्याशीं गांठ पडली. त्या जोडसैन्याशीं टक्कर देण्यांत क्रांतिकारकांच्या सैन्याचा निभाव लागेना. त्यांना तोफा वगैरे बरोबरचें युद्धसाहित्य तसेंच टाकून रणमैदानांतून नामुष्कीनें चालतें व्हावें लागलें.

फत्तेपूर पडलें. इंग्रज सोजीर शहरांत शिरले. त्यांनीं त्या संपन्न शहराची मनसोक्त लूट केली. आतां लुटण्याजोगें शहरांत कांहींही शिल्लक राहिलें नाहीं अशी खात्री होतांच त्यांनीं शहरांतील घरांमंदिरांना आगी लावून सारें शहर भस्मसात करून टाकण्याचें काम बरोबरच्या शीख शिपायांना सांगितलें!

नानासाहेबांचा मुक्काम तेव्हां कानपुरांत होता. फत्तेपूरची होळी पेटली, तिच्या ज्वाला त्यांना कानपुरांतून पाहातां आल्या. प्रथम त्यांना वाटलें कीं हे गोऱ्या लोकांचे बंगले पेटत आहेत. परंतु साऱ्या शहरभर आगीचे डोंब उसळलेले पाहून त्यांना खऱ्या प्रकाराची अमंगळ कल्पना करतां आली.

तीच कल्पना खरी ठरली. ती होळी नागरिकांच्या घरांदारांची होती. नानासाहेबांना अतोनात दुःख तर झालेंच. त्या दुःखापेक्षांही त्यांना संताप अनावर झाला.

तेवढ्यांत खबर आली कीं घरांत कैद करून ठेवलेल्या इंग्रज बायकांचा अलाहाबादच्या इंग्रज अधिकाऱ्यांशीं सुरू असलेला गुप्त पत्रव्यवहार हातीं लागला आहे. आतां त्या गुन्हेगार बायकांना काय शासन करावें ह्याविषयींची राजाज्ञा विचारायला तुरुंगावरील दरोग्याचा माणूस आला होता.

" त्या साऱ्या दगलबाजांची कत्तल करा. मडमा, मुलें, पुरुष असतील ते, ह्या साऱ्यांची एकज़ात कत्तल करा. त्यांना त्यांच्या फितुरीचें प्रायश्चित्त मिळालेंच पाहिजे. " पेशवेराजाचा हुकूम सुटला.

लगेच खाटीक बोलावून त्यांच्या हस्तें बिबीघरांतील सवाशें गोऱ्या बायकामुलांची तुरुंगाबाहेर आणून कत्तल करण्यांत आली. त्यांत तीन गोरे होते, तेही ठार झाले.

परंतु ती कत्तल कांहीं दूर पळत चाललेला विजय माघारा वळवून आणणार नव्हती. अलाहाबादपासूनच क्रांतिकारकांच्या पायांखालची वाळू सरकूं लागली होती. परिस्थिति आपल्या आवाक्याबाहेर चालली असें नानासाहेबांना वाटूं लागलें. त्यांनीं आपले जवळपासचे सारे कार्यकर्ते सहकारी विचारविनिमयासाठीं बोलावले. ताबडतोबीचा प्रश्न कानपूर लढवावें कीं खालीं करून निघून जावें, हा होता.

परंतु निघून जायला दुसरीकडे खात्रीची सुरक्षित जागा तरी आतां कोठें उरली होती ? जिकडे तिकडे दिल्लीच्या वाटेवर जनरल हॅवलॉकनें नुसता अनर्थ करून सोडला होता. असंख्य निरपराधी रयत तर ठार झालेच होते. एकही खेडें बेचिराग न होतां मोकळें सुटलें नव्हतें. रस्त्यानें हातीं सापडतील त्या लोकांना झाडांझाडांवर दहशतीदाखल फांशीं देण्यांत येई. त्यांचीं प्रेतें झाडांवर लोंबकळत होतीं. तो हॅवलॉक तेवढ्यांत कानपुरला येऊन भिडला.

आतां शहर सोडून जावें तरी नाश ; सोडून न जावें तरी नाश.

अखेर सर्वांनुमतें निर्णय ठरला. आतां येथून पुढें विजय किंवा मरण. तिसरी बात नाहीं. पैकीं मरण तर कोणाला न विचारतां आपण होऊन नानासाहेबांदि क्रांतिकारकांची विचारपूस करीत अगत्यपूर्वक झपाट्यानें जवळ जवळ येतच होतें. इंग्रजांना विजय मिळत गेला तसें त्यांचें धैर्य आणि सूडाची भावना व निर्धार वाढूं लागला. क्रांतिकारकांत निराशा वाढत चालली तसा त्यांचा धीर सुटत चालला. विस्कळितपणा वाढत चालला.

अखेर कानपूर इंग्रजांच्या हातीं पडलें. तारीख १७ जुलै रोजीं हॅवलॉकचें विजयी सैन्य वाजत गाजत कानपुरांत शिरलें.

“ इंग्रजांनीं बेलाशक कानपूर लुटावें. ” हॅवलॉकची परवानगी गोऱ्या सोजिरांना मिळाली. ती परवानगी मिळण्याचा अवकाश. शेकडों गोरे सोजीर, अधिकारी, आणि शीख सैनिकही जखमी सिंहावर गिधाडें तुटून पडावीं तसे कानपूरवर तुटून पडले.

बिबिघर हा नानासाहेबांनीं इंग्रजांसाठीं योजिलेला तुरुंग. नुक्तीच तेथील इंग्रज कैद्यांची कत्तल झालेली. तें इंग्रजी रक्त तेथें सांडलेलें गोठत सांकळत होतें. हॅवलॉकला त्याचा विसर पडला नव्हता. त्यानें शहरांतून कांहीं ब्राह्मण पकडून आणले. हेर फितुरांनीं क्रांतिकारकांशीं सामील असलेल्या नागरिकांचीं नांवें सांगितलीं. त्या आधारानें धरपकड झाली. त्यांना हॅवलॉकनें शिक्षा फर्माविली, “ बिबीघरांतील जमिनीवर ह्या हरामखोरांच्या भाईबंदांनीं सांडलेलें इंग्रजांचें रक्त ह्यांच्याकडून चाटून पुसून साफ करून घ्या आणि मग ह्यांना फांसावर चढवा. ”

ही भयंकर शिक्षा कोणाच्याही अंगावर शहारे आणणारी खरी, पण अशी अमानुष शिक्षा क्रांतिकारकांना देण्यांत इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांचा विशिष्ट हेतु होता. तेव्हांच्या एका इंग्रज अधिकाऱ्याच्या शब्दांत सांगायचें तर “ हिंदु लोकांना, विशेषतः ब्राह्मणांना असें फिरंग्यांचें रक्त चाटून साफ करायला लावणें हें त्यांच्या धर्मभावना ठार करण्यासारखें होतें. आम्ही तें जाणत होतों. परंतु आम्हांला बंडखोरांवर पुरता सूड घ्यायचा होता.

मरणापूर्वी आपला धर्म बुडाला, आपण बाटलों, अशा भयंकर वेदना त्यांना सहन करायला लावून त्यांना हिंदु म्हणून मरूंही न देणें, ह्यांत आमचें सूडाचें समाधान होतें."

क्रांतिकारकांनींही गोऱ्यांची कत्तल केली. अघोर कत्तल केली. परंतु त्यांनीं त्यांच्या अगर कोणाच्याही धर्मभावना अशा दुखवल्या नाहींत. खिस्ती लोकांना त्यांनीं त्यांच्या धर्माप्रमाणें ठार करण्यापूर्वी बायबलाचें पठण करूं दिलें होतें.

कानपूरचा असा सर्वंकष संहार चालला असतांना हॅवलॉक आणि त्याचे सहकारी इंग्रज ह्यांच्या आसुरी आनंदाला पारावार नव्हता.

## स्वा ध्या य

१. लॉर्ड कॅनिंग राजधानी कलकत्ता सोडून अलाहाबादला तळ देऊन कां राहिला ?

२. नीलच्या राक्षसी अत्याचारांतून दिल्ली–अंबाला–कानपूर टापू सोडविण्यासाठीं लॉर्ड कॅनिंगनें काय उपाय केला ?

३. हॅवलॉक हा सवाई नील कसा ?

४. फत्तेपूर कसें पडलें ?

५. बिबीघरांत कोंडून ठेवण्यांत आलेल्या गोऱ्या बायकांना प्राणान्त शासन भोगण्याचा प्रसंग कां आला ?

६. हॅवलॉकनें 'बिबीघर' कत्तलीचा सूड कसा घेतला ?

७. क्रांतिकारकांनीं केलेली कत्तल आणि हॅवलॉकच्या गोऱ्या सोजिरांनीं केलेली कत्तल ह्यांची तुलना करा. अधिक भयंकर कोणती व कां तें सांगा.





प्रकरण एकोणिसावें

# बिहारच्या सिंहाची कोंडमारा



बिहारमधील पाटणा शहर हें तर क्रांतिकारकांचें एक प्रधान केंद्र. इंग्रजांचा अयोध्या-बिहारांत जनतेवर झालेला जुलूमही भयंकर होता आणि इंग्रजांच्या रोषाला सफा बळी पडलेले मोठमोठे हिंदु-मुसलमान जहागीरदार, सरदारही त्या टापूंत अनेक होते. ते सारे क्रांतीची आग इंग्रजांविरुद्ध केव्हां भडकते ह्याची आतुरतेनें वाटच पाहात होते.

प्रांताचें लष्करी ठाणें जवळच दानापूर येथें होतें. तेथें देशी पायदळ, गोरें घोडदळ, तोफखाना, असें लष्करी बळ होतें. तेथून जवळच सिग्वालीला हिंदी घोडदळ होतें. मेजर जनरल लॉईड हा त्यावर मुख्य लष्करी अधिकारी होता.

तेथला कमिशनर टेलर मोठा चिवट आणि धूर्त माणूस. तो अतिशय जागरूकपणानें क्रांतिकारकांच्या हालचालींच्या सर्व बातम्या काढीत होता. त्याला माहीत होतें कीं बिहारमधील मोठमोठे अनेक जमीनदार, सरदार तेथील क्रांतिसमितीचे संचालक आहेत. तेथील रयतेंतही अगदीं साध्या पोलिसापासून तों पेठेंतील पुस्तकविक्यापावेतों क्रांतीची हांक जाऊन पोहोंचल्याचें तो जाणत होता. क्रांतिकारकांचा आपसांत चालणारा गुप्त पत्रव्यवहारही त्यानें आपल्या फितूर हेरांच्या मदतीनें हस्तगत केला होता. पाटणा पेटणार ह्याची टेलरला प्रथमपासूनच कल्पना होती.

आपल्या देशी फौजेवर जरी कमिशनर टेलरचा भरंवसा नव्हता, तरी त्यांतील शीखांवर मात्र पूर्ण भरंवसा होता. आतां पाटणा पेटण्याची वेळ जवळ येत आहे असें जेव्हां त्यानें पाहिलें, तेव्हां तिकडील रक्षणासाठीं त्यानें दोनशें शीख शिपायांना पाटणाला रवाना केलें.

ह्या क्रांतिसंगरांत शीख शिपाई अस्तनींतील निखाऱ्यांसारखे कसे वागतात ह्याची चुणूक रयतेलाही थोडी थोडी कळूं लागली होती. ते शीख शिपाई पाटणाकडे निघाले, तेव्हां मार्गांतील खेडोंपाडींचे खेडूतदेखील त्यांना विचारूं लागले, "अरे, तुम्ही शीख कीं फिरंगी? थूः तुमच्या जिनगानीवर!"

टेलरनें रक्ताचा एक थेंबही न सांडतां आणि गडबड घोटाळा होऊं न देतां केवळ भेदनीतीच्या जोरावर बरेचसे क्रांतिनेते पकडले. त्यांचा तडकाफडकीं न्याय करून त्यांना तुरुंगांत तरी डांबलें, किंवा फांशीं तरी दिलें.

पाटणाचा एक पुस्तकविक्या अली अमीर हा तरुण देशभक्त त्यांतला एक होता. तो दिसायला अगदीं साधा, गरीबसा पुस्तकांचा एक दुकानदार. पण त्याच्या उज्ज्वल स्वदेशाभिमानाला सीमा नव्हती. पाटणांतील क्रांतीच्या पंचप्राणांपैकीं तो एक प्राण होता. त्यालाच पकडलें. क्रांतिकारकांचीं नांवें आणि त्यांचे नेते ह्यांची माहिती काढण्यासाठीं त्याचे भयंकर हाल हाल केले. पण बहादराच्या तोंडून ब्र निघेल तर शपथ.

शेवटीं त्याला फांशीची शिक्षा झाली. ती त्यानें शांतपणें ऐकून घेतली. त्याला फांसावर चढवण्यासाठीं नेण्यांत आलें. तेव्हां तो हसत हसत मक्केच्या यात्रेला चालल्यासारखा फांसाकडे गेला. फांसांत मान देतांना त्याला आपणाबरोबरच पकडला गेलेल्या त्याच्या एकुलत्या एका प्रिय पुत्राची आठवण झाली. तेव्हां मात्र त्याला दुःखाचा हुंदका आवरतां आला नाहीं.

कमिशनर टेलर जवळ उभा होता. त्याला आशा वाटूं लागली कीं हा बुरूज ढांसळण्याची हीच वेळ आहे.

"तूं जर आतां तरी कटवाल्यांचीं नांवें सांगशील, तर तुलाही सोडीन आणि तुझ्या लेकालाही जीवदान मिळेल."

त्यावर अली अमीर निर्भयपणें उत्तरला, "नाहीं. तुम्ही मला खुशाल फांशीं द्या. तुम्ही मला ठार कराल. परंतु माझें ध्येय तुम्हांला ठार करतां येणार नाहीं. मला तुम्ही खुशाल ठार करा. माझ्या रक्ताच्या थेंबाथेंबागणिक नवे शहीद निर्माण होतील. ते तुमची जुलमी इंग्रजी राजवट धुळीला मिळवतील." हुतात्मा अली अमीर फांसावर चढतांना उद्गारला.

असे एकेक क्रांतिनेते टेलरनें टिपून ह्या जगांतून नाहींसे केले. आंत बिहारांत क्रांतिकारकांना एकटा एक म्हातारा आधार जगदीशपूरच्या राणा कुमारसिंहाचा. राणा ऐशीं वर्षांचा म्हातारा. सुळे उपटून टाकलेल्या सिंहासारखा इंग्रजांच्या कुटिल नीतीपायीं सर्वस्व गमावून स्वतःच्या राजवाड्यांत स्वतःला कोंडून घेऊन जिवंतपणीं मेलासा होऊन गप्प बसला होता. त्याला साऱ्या क्रांतिकारकांनीं जाऊन जेव्हां भीड घातली, धरणें धरलें, तेव्हां म्हाताऱ्याला राहावेना. त्याच्या ठायींचें क्षात्रतेज एकदम उफाळून उठलें. त्यानें क्रांतिकारकांचें नेतृत्व करण्याचें कबूल केलें.

"चला. मायभूमीच्या उद्धारासाठीं आपण मारूं किंवा मरूं. पण माघार घेणार नाहीं." असा आपल्या अनुयायांना धीर देत राणा तरवार घेऊन उठला.

म्हातारा राणा क्रांतिकारकांचा नेता झाला, त्यासरसे बिहारमधील मरू घातलेल्या क्रांतींत पंचप्राण ओतले गेले. क्रांतिकारकांना जोर चढला. लगेच बिहारचें क्रांतिकुंड पेटूं लागलें.

पहिला हल्ला शहाबादवर झाला. शहाबादचें मुख्य ठाणें आऱ्हा. क्रांतिकारकांची धाड प्रथम आऱ्हा येथील गडगंज खजिन्यावर पडली. खजिना लुटला. नंतर कचेरीवरचें इंग्रजी निशाण खालीं ओढून तेथें स्वातंत्र्यध्वज फडकाविला. तेथून तो शूरांचा मोर्चा तसाच तुरुंगाकडे वळला. तुरुंग फोडला. तुरुंगांतील सारे देशभक्त कैदी मोकळे झाले. तेही क्रांतिकारकांत सामील झाले.

"चला. आतां किल्ला सर करा." क्रांतिसेनेला सेनापतीचा हुकूम झाला. तशी सारी सेना किल्ल्यावर चालून गेली.

आऱ्हा किल्ला हें इंग्रजांचें बिहारमधील काळीज होतें. आंत गोरे सैनिक होते. शीख सैनिक होते. भरपूर युद्धसाहित्य होतें. बरेच दिवस किल्ला लढवावा लागला तरी अडचण पडूं नये इतकी भरपूर अन्नवस्त्रसामुग्री किल्ल्यावर होती. शिवाय पाटणाहून ताज्या दमाचे नवे पन्नास शीख शिपाई नुकतेच किल्ल्याच्या रक्षणार्थ येऊन थडकले होते.

क्रांतिसेनेनें किल्ल्याला वेढा घातला. पण आंतून विरोध फार. त्यामुळें किल्ला फुटेना. तोंच मागाहून मेजर आयर नवें गोरें सैन्य घेऊन दानापूरहून आऱ्हाचा बचाव करायला आला. तो तर क्रांतिकारकांची आणि क्रांतिकारकांना सहानुभूति दाखविणाऱ्या बिहारी खेडुतांचीही वाटेनें कत्तल करीतच सैतानासारखा चालून आला.

आंतून गोऱ्या आणि शीख शिपायांनीं केलेला भडिमार, आणि बाहेरून आयरचा मरणघावी हल्ला. अशा पेंचांत क्रांतिसेना सापडली. तरीही आठवडाभर क्रांतिकारकांनीं वेढा नेटानें आंवळून धरला. तेवढ्या मुदतींत गिधाडांसारखी आणखी आजूबाजूची इंग्रज सेना आऱ्हाच्या मदतीला धावून आली.

एवढ्या अफाट शत्रुबलापुढें क्रांतिकारकांचा अगदीं नाइलाज झाला. त्यांना वेढा सोडून माघार घ्यावी लागली. सारी दाणादाण उडाली. राणा कुमारसिंगाला आऱ्हा सोडून जगदीशपूरच्या आश्रयाला जावें लागलें.

अखेर आऱ्हावर इंग्रजांचा अंमल झाला. पण मेजर आयरचें तेवढ्यावर समाधान नव्हतें. तो कुमारसिंगाला पकडण्यासाठीं जगदीशपूरकडे त्याच्या राजवाड्याच्या रोखानें त्याचा पाठलाग करीत दौडत निघाला.

पण राणा कांहीं त्याच्या हातीं सापडला नाहीं. त्यानें जगदीशपुरांत आयरचा शिरकाव होण्यापूर्वीच गनिमी काव्याची लढाई आरंभून जवळच्या जंगलाचा आसरा घेतला.

मेजर आयर जगदीशपूरच्या राण्याच्या राजवाड्यांत तळ ठोकून विहारमधील क्रांतीचीं पाळेंमुळें खणून काढूं लागला.

## स्वाध्याय

१. पाटणा हें क्रांतिकारकांचे महत्त्वाचें केंद्र कसें ?

२. विहार प्रांताचें लष्करी बळ क्रांतीच्या वेळीं कसें होतें ?

३. कमिशनर टेलरचा देशी फौजांवर भरंवसा नव्हता ; पण त्यांतील शीख फौजेवर फक्त भरंवसा होता. ह्याचे कारण काय ?

४. अली अमीर हा कोण होता ? त्यानें काय केलें ?

५. राणा कुमारसिंग ह्याला चेव कां आला ? त्यानें पुढारीपण पत्करतांच विहारमधील क्रांतीचें स्वरूप कसें पालटलें ?

६. मेजर आयरच्या लीला वर्णन करा.





## प्रकरण विसावें

# दिल्ली पडली !



इंग्रज देखील दिल्लींत आतां अगदीं इरेला पेटले होते. ते दिल्लीच्या तटावर धडकांवर धडका देत होते. आणि कांहीं इलाज चालत नाहीं म्हणून खाशीं टाळकीं शेकून घेऊन चडफडत माघारे वळत होते.

ह्यांत आपल्या सेनापतीचेंच चुकतें, अशी इंग्रज वरिष्ठांची कल्पना. म्हणून दिल्लीवर कार्यक्षम सेनानी ब्रिगेडियर जनरल विल्सन ह्याची नेमणूक झाली. परंतु विल्सनची देखील अवस्था महापुरांत सापडलेल्या एकाकी बेटावरील वीरासारखी झाली. तो खूप शूर आणि हिकमती होता. पण बाहेरची कोणतीही खबर अशी त्याला मिळेना; आणि किल्ल्यांतील क्रांतिसेनेच्या जमावाला तोंड द्यायला खात्रीची कुमकही येईना. तेथें तो एकटा तरी काय करणार ?

दिल्लीच्या किल्ल्यांत तेव्हां पन्नास हजार क्रांतिसेना जमा झाली होती. क्रांतिसंग्राम पुढें चालवणारा चांगला नेता भेटेना, म्हणून ती शीड फाटलेल्या प्रचंड नावेसारखी समुद्रांत अधांतरीं त्रिशंकूप्रमाणें लोंबकळत होती. बाहेर विल्सनला ही बातमी मिळाली होती. पण हल्ला करण्याचा धीर त्याला होईना. कारण पन्नास हजार जवानांशीं गांठ होती. त्याच्या ताब्यांतील सेना त्या मानानें फार अपुरी होती.

तथापि इंग्रजांचें नशीब जोरावर. त्यांना तेवढ्यांत कमांडर निकल्सन हा धडाडीचा सेनानी दोन हजार गोरें लष्कर घेऊन दिल्ली घेण्यासाठीं विल्सनच्या मदतीला आला. त्याबरोबर एका महिन्यांत इंग्रजांची ढांसळती बाजू पुन्हा चांगली सांवरली. तशी क्रांतिसेनेची बाजू सांवरायला कांहीं मार्ग सापडेना. क्रांतिसेनेला खंबीर नेता हवा होता, तो कांहीं मिळेना. बाहेरून इंग्रजांचा किल्ल्याला बळकट वेढा पडलेला. बाहेर नेते होते; पण ते पांगलेले. त्यांचे पाय दिल्लीला लागण्याची सोय नव्हती.

किल्ल्यांत क्रांतिसेना म्हाताऱ्या बादशाहा बहादुरशाहाला खऱ्या अर्थानें क्रांतीचें नेतृत्व करायला परोपरीनें विनवीत होती. परंतु त्याला तो भार झेपण्याजोगा नव्हता. त्याची स्वतःचीच अवस्था हातपाय गळल्यासारखी झाली होती.

"मला हें जोखमाचं काम झेपणार नाहीं. माझी अडचण तुम्हांला होते आहे असं मला वाटतं. मी पाहिजे तर खुषीनें गादी सोडायलाही तयार आहें. कोणीही पुढें येऊन ती मध्येंच गटंगळ्या खाणारी क्रांतीची नाव पैलतीराला हाकारून न्यावी आणि दिल्ली फत्ते करावी. इंग्रजांच्या गुलामगिरींतून देश स्वतंत्र करावा आणि बादशाही गादीवर बसावें. हिंदु आणि मुसलमान हा भेद तिथें नको."

बादशाहाच्या ह्या केविलवाण्या उद्गारांत ब्रह्मावर्ताच्या पराक्रमी हिंदु राजाचें प्रतिबिंब उमटलेलें अनेकांना दिसलें. बरें, त्याबद्दल क्रांतिकारकांनाही कांहीं विषाद वाटला नाहीं. तथापि लंकेंत सोन्याच्या विटा, तशी रणशूर

नानासाहेब पेशवेराजांची अवस्था होती. बाहेर इंग्रजांच्या वाढत्या जोरामुळें आणि क्रांतिसेनेंतील विस्कळितपणामुळें रक्तामांसाचा चिखल करून त्यांनीं बांधलेले क्रांतीचे बुरुज एकामागून एक ढासळूं लागले होते. त्यांची सावरासावर कशी करावी ही अवघड समस्या नानासाहेबादि क्रांतिनेत्यांपुढें होती. त्यांतून त्यांनीं सर्वांच्या विचारानें खंबीरपणें मार्ग काढला असता. परंतु दिल्लीपावेतों जायला वाट कोठे मोकळी होती ?

बादशाहानें आपल्या परीनें परिस्थिति सावरण्याची शिकस्त चालविली होती. जयपूर, अलवार, जोधपूर, बिकानेर, अशा आवर्तीभोवर्तीच्या राजांकडे स्वदस्तुरचीं पत्रें घेऊन त्याचे जासूद रवाना झाले होते. ' कोणीही या, पण दिल्ली वांचवा. इंग्रजांच्या मगरमिठींतून भारतमातेला स्वतंत्र करा. मी सर्वस्वीं तुमचा आहें. '

आजवर हिंदूंपुढें कधींही अजीजीनें न नमणारी, हिंदूंना कधींही न जुमानणारी मोगल बादशाही आज परिस्थितीप्रमाणें हिंदु-मुसलमान हा आपसांतील भेदभाव विसरून राष्ट्राचा सेवक व्हायला तयार होती. पण बादशाहाला आपला मानायला ते हिंदी राजेरजवाडे कोठे तयार होते ? त्यांना आपल्या मायभूमीपेक्षां इंग्रज जवळचे वाटत होते.

दिल्लींत नकर्तेपणामुळें माशा मारीत बसलेली क्रांतिसेना आधींच हवालदिल झाली होती. तिच्यावर बाहेरून इंग्रजी लष्कराचें वाढतें दडपण पडूं लागलें; तसे किल्ल्यांतील सैनिक अधिकच बेदिल झाले. सांचलेल्या पाण्यावर डांस घोंघावूं लागतात तसा दिल्लीच्या किल्ल्यांतील सैनिकांत आपसांत असंतोष वाढूं लागला. त्यांतून फाटाफुटीचें तण वाढीला लागलें. त्यांच्यांतच निमच विरुद्ध बरेली असे एकमेकांविरुद्ध गट पडूं लागले. एकीच्या अमृतकुंभाला भले मोठे तडे पडले. कुंभ गळून रिकामा झाला.

बाहेरून इंग्रजांची वज्रधडक आंत किल्ल्यांत येऊन आदळली. खणाखणीच्या लढाईला तोंड लागलें. तेव्हां बादशाहानें आपल्या विश्वासांतील सेनानी बक्षखानाला बोलावून त्याला साऱ्या सैन्याचा सेनापति नेमलें. पण

सेनाच निराशेनें आणि असंतोषानें बेदिल आणि बेशिस्त झाल्यावर सेनापति तरी तेथें काय करणार? कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसा झाला. लढा तर प्राणांवर बेतलेला. तरीही एकविचारानें कोणीही लढायला राजी नाहीं. त्यामुळें एकजुटीनें लढणाऱ्या इंग्रजी लष्कराला क्रांतिसेनेची वाट लावणें फार सोपें झालें. बरेलीविरुद्ध उठून फाटाफुटीचा यादवीचा बावटा क्रांतिसेनेंत रोवणारी निमचची हूड पलटण तर पहिल्या सपाट्याला सफा कापली गेली. सेप्टेंबरच्या पहिल्या तारखेपासून पंधरा दिवस दिल्लींत असा तुंबळ रणसंग्राम चालला होता.

अशा आणीबाणीच्या वेळीं बादशाहाचा शब्द तरी क्रांतिसेना ऐकेल, ह्या आशेनें सेनापति बक्षखान बादशाहाला शोधूं लागला. बादशाहा दूर व त्यांतल्यात्यांत सुरक्षित अशा अगदीं एका बाजूच्या राजवाड्यांत मिर्झा इलाहीबक्ष ह्या साळसूद सल्लागाराशीं सल्लामसलत करीत बसला होता. इलाहीबक्षाचा हितोपदेश बादशाहाला सुरू होता, " खाविंद ! आतां ह्या बंडाळींत आपला लढून निभाव लागणार नाहीं. आपण किल्ल्याबाहेर पडा, आणि योग्य वेळ पाहून इंग्रजांना शरण जा. मायबाप कंपनीसरकार आपली नक्की कदर करील."

बादशाहालाही तो हितोपदेश आतां पटूं लागला होता.

तेवढ्यांत बक्षखान शोध करीत त्या राजवाड्यांत आला. पण तो बादशाहापुढें येतांक्षणीं मिर्झा इलाहीबक्षाच्या तोंडाला कुलुप !

" खाविंद ! ह्या वेळीं जर आपण पुढें होऊन फौजेला जातीनें धीर द्याल, तरच उपयोग आहे. अजूनही आपली फौज एकोप्यानें इंग्रजांशीं झगडली, तर फत्ते नक्की आपली आहे."

पण बादशाहा त्यावर कांहींच बोलेना. चिखलांतल्या मेढीसारखा तो डळमळत होता.

बादशाहाची तशी मर्जी नाहीं असें पाहून सेनापति बक्षखान कर्माला हात लावून मुकाटपणें माघारा गेला. तो नजरेआड होतांच बादशाहा

इलाहीबक्षाच्या सल्ल्यानुसार त्याच्याच सोबतीनें कोणाला न कळवितां हळूच किल्ल्याबाहेर पडला आणि तसाच दिल्लींतील हुमायुनाच्या प्रशस्त कबरेंत जाऊन लपून बसला.

बादशाहाच्या मागोमाग त्याच्या अनेक मुलांपैकीं मिर्झा खिझर सुलतान, मोगल मिर्झा आणि अबूबख्त हे त्याचे लाडके शहाजादेही त्या कबरेकडे गेले.

त्या बिचाऱ्या दुर्दैवी राजपुरुषांना आपण आपल्या पायांनीं आपल्याच कबरेकडे चाललों आहों ह्याची तेव्हां कल्पनाही नव्हती !

दिल्लींतील प्राण अशा प्रकारें निघून गेला आणि साऱ्या दिल्लीभर भयंकर लुटालूट, कत्तल सुरू झाली. त्या दिल्लीच्या वाताहतीचें वर्णन करायला कोणाही भारतसंतानाची वाणी आणि लेखणी धजणार नाहीं. लॉर्ड एल्फिन्स्टनच्या शब्दांत सांगायचें तर 'दिल्लीचा वेढा संपल्यावर आमच्या सैन्यानें दिल्लींत जे अत्याचार केले, ते हृदयाला पीळ पाडणारे आहेत. हा मित्र आणि हा शत्रु ह्याचा कांहींही विचार न करतां सर्वांवर सर्वतोपरी सूड घेण्यांत आला. लूटमारीविषयीं बोलायचें, तर खरोखरच नादिरशहा आमच्यापुढें फिका पडेल ! ....'

## स्वाध्याय

१. दिल्लींत विल्सनची कुचंबणा कशी व कां झाली ?
२. दिल्लींत इंग्रजांची ढांसळती बाजू एकदम कशी सांवरली गेली ?
३. इंग्रजांचा जोर पाहून दिल्लीचा बादशाहा कसा घाबरला ? बादशाहानें काय करावें अशी क्रांतिकारकांची अपेक्षा होती? ती फोल कशी झाली ?
४. संकटांतून पार पडण्यासाठीं बादशाहाची कशी धडपड चालली होती ?
५. दिल्लींतील तुंबळ रणसंग्रामाचें वर्णन करा.
६. इलाहीबक्षानें बादशाहाला काय सल्ला दिला ? तो बादशाहाला कितपत पटला ?
७. दिल्लींतील इंग्रजी अत्याचारांबद्दल लॉर्ड एल्फिन्स्टन काय म्हणतो ?





प्रकरण एकविसावें

# लखनौ पडलें !



विजय मिळविणें जितकें अवघड असतें, त्यापेक्षांही मिळालेला विजय टिकविणें फार अवघड असतें.

लखनौला क्रांतिसेनेला जूनच्या पहिल्या आठवड्यांत विजय मिळाला. अयोध्येचा नबाब वाजीदअल्ली कलकत्त्याला इंग्रजांच्या तुरुंगांत असल्यामुळें त्याचा पुत्र शहाजादा बिर्जिस कादीर ह्याला गादीवर बसविण्यांत आलें. हा नवा नबाब अल्पवयी असल्यामुळें राज्याचा सारा कारभार नबाबाची आई बेगम हजरत महाल ही पाहूं लागली. दिल्लीचा कारभार बादशाहाच्या ऐवजीं त्याची बेगम झिनत महाल पाहत होती. तशीच ही दुसरी बेगमही राज्यकर्ती शोभूं लागली. लखनौमधील राष्ट्रीय क्रांति अशा प्रकारें पूर्ण झाली होती.

परंतु क्रांतीनंतर राज्यव्यवस्था व्हावी तशी नीट होईना. कारभारी म्हणून जो पुढें यावा, तो माझेंच खरें, मीच शहाणा, अशा बेजबाबदार उन्मत्तपणानें वागूं लागला. गादीवर बेगम केवळ बाहुल्यासारखी दिसत होती. तिचा हुकूम कोणी मानीना. कोणाचा पायपोस कोणाच्या पायीं राहीना. नवीन नेमलेले कारभारी आणि साधे शिपाईदेखील रयतेवर असा जुल्म करूं लागले कीं ' देवा ! ह्या दांडगेश्वरांच्या हातून आम्हांला एकदाचे सोडव ' अशी देवाची प्रार्थना करण्याचा प्रसंग रयतेवर आला.

तरीदेखील त्यांत कांहीं थोर मनाचे जबाबदार नेते होते. त्यांचें शिपायांवर कांहींसें वजन होतें. अजून इंग्रजांची कीड रेसिडेन्सींत शिल्लक होती. परीक्षिति राजाला किडीचें रूप घेऊन डसायला आलेल्या तक्षका-सारखी ती कीड केव्हां तक्षक बनून कसा चावा घेईल ह्याचा नेम नव्हता. त्यासाठीं ती कीड लौकर नाहींशी करणें अवश्य होतें. क्रांतिसेनेच्या तोफखान्याचा मारा एकसारखा रेसिडेन्सीवर सुरू होता. पण दिवसांमागून दिवस लोटले तरी विजयश्री कांहीं केल्या दृष्टिपथांत येईना.

अखेर जुलैच्या २० तारखेला रेसिडेन्सीवर जोराचा हल्ला करण्याचें क्रांतिकारकांनीं ठरविलें. त्या दिवशीं सकाळीं क्रांतिसेनेच्या तोफखान्याचें धडाडधुप एकाएकीं थांबलें. कारण रेसिडेन्सीच्या भिंतींखालीं क्रांति-कारकांनीं सुरुंग पेरून ठेवले होते. ते सुरुंग उडण्याची क्रांतिसेना वाट पाहात होती.

ते सुरुंग उडाले. तटाला मोठें थोरलें भगदाड पडलें. त्या भगदाडांतून क्रांतिसेना पुढें घुसली. परंतु हॅवलॉकच्या यशस्वी नेतृत्वाखालीं इंग्रज शिपायांनीं तो हल्ला नेटानें परतविला. क्रांतिसेनेनें हल्ला करावा आणि आंतील इंग्रजांनीं तो प्राणपणानें परतवावा, असा क्रम सुरू झाला. त्या झगड्यांत इंग्रज बहादुरीनें अखेरपावेतों टिकले.

क्रांतिसेनेचा इंग्रजांपुढें टिकाव लागला नाहीं. कारण आतांचें तेथलें क्रांतिसैन्य म्हणजे आंवळ्यांची मोट होती. जमीनदार, तालुकदार,

जहागीरदार ह्यांनीं आयत्या वेळीं वेठीला धरल्यासारखें गोळा करून आणलेलें सैन्य तें. कापसाच्या म्हाताऱ्यांसारखी कसलेल्या गोऱ्या सैन्यापुढें त्याची गत होऊं लागली. सैन्याला तोटा नव्हता. नानासाहेबांचीही तिकडे सैन्यउभारणी चालू होती. सागर, ग्वाल्हेर वगैरे ठिकाणांहून क्रांतिकारकांची सेना एकसारखी पुढें येतांना दिसत होती. पण त्यांत वाईट हें कीं एकाचा दुसऱ्याशीं मेळ नव्हता.

इंग्रजांच्या फळींतदेखील झगडा आणि चुरस मुळींच नव्हती असें नाहीं. नील आणि हॅवलॉक हे दोघेही सेनानी एकमेकांशीं अतिशय बांकानें वागत होते. परंतु त्यांचा मोठेपणाविषयींचा, सत्तेविषयींचा झगडा त्या दोघांपुरता. त्यांच्या हुकमतींतील सैन्यावर अथवा हातीं घेतलेल्या लढाईच्या कार्यावर त्याचा कांहींही परिणाम होत नव्हता.

तेवढ्यांत नानासाहेबांनीं एकवार हातून गेलेलें ब्रह्मावर्त घेतल्याची बातमी आली. त्यामुळें क्रांतिसेनेंत कांहीं काळ नवा धीटपणा उपजला. अनेक दिवस चाललेल्या लढाईत हॅवलॉकचेंही म्हणण्याजोगें पुढें पाऊल पडेना असें गव्हर्नर जनरल कॅनिंगला वाटलें. म्हणून कीं काय, त्यानें सर जेम्स आउट्रॅम ह्याला सरसेनापति नेमून लखनौकडे पाठविलें. परंतु त्यानें येतांक्षणीं आपले अधिकार हॅवलॉकच्या सुपूर्द केले.

लखनौच्या चुरशीच्या लढ्यांत इंग्रजांची फळी चांगलीच बळकट झाली. आयर, आउट्रॅम, हॅवलॉक, असे पट्टीचे रणझुंझार लखनौचा पाडाव करून अयोध्याप्रांत पुन्हा कंपनीसरकारच्या अमलाखालीं खेचून आणायचाच अशा निर्धारानें रेसिडेन्सी लढविण्यासाठीं चंग बांधून लढायला उभे होते. क्रांतिकारकांची मगरमिठी तोडून रेसिडेन्सींत जाऊन पोचायला इंग्रज सेनेला सतत सत्यायशीं दिवस जिवावर उदार होऊन झगडावें लागलें. रेसिडेन्सीमधील सातशें गोरे धारातीर्थीं बळी पडले. बाकीचे उरलेले पांचशें गोरे शिपाई व चारशें देशी शिपाई, कांहीं दमले भागलेले, कांहीं

जखमी झालेले, असे उभे होते. शिवाय हॅवलॉकच्या सैन्याला रेसिडेन्सी गांठीपावेतों सातशें बत्तीस गोरे शिपाई बळी द्यावे लागले.

एवढी जबर किंमत देऊन कां होईना, पण कंपनीसरकारच्या सैन्यानें अखेर लखनौवर विजय मिळविलाच.

ह्याप्रमाणें सत्तावनी आवर्तांत गमावलेला मुलुख पुन्हा कंपनीसरकारच्या कबजांत येऊं लागला. तेव्हां त्या मुलुखाची व्यवस्था करून कंपनीसरकारचा अवघड राज्यकारभाराचा भार हलका करण्याचें काम करणें प्राप्त झालें. सरसेनापति तें अधिक महत्त्वाचें काम करण्यासाठीं, लखनौकडील लढाई इंग्रज सेना आणि क्रांतिसेना ह्यांना लढण्यासाठीं तशीच मोकळी सोडून निघून गेला. त्याच्या जागीं सर कॉलिन कॅम्बेल हा नवा सरसेनापति नेमला गेला. लखनौ पूर्णपणें ताब्यांत आल्यावर इंग्रजांच्या लष्करानें शहरांत आणि आजूबाजूच्या मोठ्या टापूंत खेडोपाडीं जे अत्याचार केले, ते खऱ्या माणसांना कधींच करवले नसते. कॅम्बेलच्या हुकमतीखालीं लखनौ ही यमपुरी बनली होती. गोरे शिपाई क्रूरपणानें यमदूतांना लाजवीत होते.

लखनौच्या झगड्यांत क्रांतिकारकांच्या बाजूनें स्वतःच्या कर्तव्यपालनाची शिकस्त करणारा जबाबदार नेता असा एकच मौलवी अहंमदशाहा हा होता. परंतु त्याच्या एकट्याच्या हातून खात्रीच्या मूठभर लोकांनिशीं कितीसें कार्य होणार ? आपला कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून मौलवी प्राणपणानें लढतां लढतां अखेर लखनौ सोडून निघून गेला. त्याच्या पाठीवर कॅम्बेलचे गोरे बहिरीससाणे होते. पण त्यांना त्यानें दाद दिली नाहीं. लखनौ पडलेलें आपणाला पाहवणार नाहीं, म्हणून तोंपर्यंत तो थांबलाच नाहीं.

डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यापर्यंत लखनौची पुरी वाताहात झाली. आणखीही वाताहात करून क्रांतिकारकांचा त्या टापूंत बींमोड करून दहशत बसविण्याला कॅम्बेल कमी करता ना, परंतु तिकडे कानपूरकडे सेनापति तात्या टोपेनें अनर्थ उडवून दिला आहे अशा भीतिदायक

बातम्या ऐकूं येऊं लागल्या. तेव्हां तात्याचा बंदोबस्त करण्यासाठीं त्याला सैन्य घेऊन कानपुराकडे कूच करावें लागलें.

## स्वाध्याय

१. लखनौच्या विजयानंतर तेथील राज्यकारभार कसा चालला होता ?

२. जुलैच्या वीस तारखेला लखनौमध्यें काय झालें ?

३. इंग्रजांपुढें लखनौंत क्रांतिसैन्याचा टिकाव कां लागला नाहीं ?

४. लखनौच्या इंग्रज सेनानींमधील चुरस इंग्रजांना लढ्यांत नडली कीं नाहीं ? कां ?

५. क्रांतिकारकांतही चुरस किंवा फाटाफूट होती, त्याचा काय परिणाम झाला ?

६. लखनौमधील चुरशीच्या लढ्याचा इंग्रजांवर काय परिणाम झाला ?

७. इंग्रजांनीं लखनौची रेसिडेन्सी कशी लढविली ?

८. इंग्रज सरसेनापति लखनौकडील लढाई सोडून का गेला ?

९. लखनौच्या झगड्यांत नांव घेण्याजोगा जबाबदार भला क्रांतिकारक कोण होता ? त्यानें काय केलें ? कां ?

१०. कॅम्बेलनें लखनौमध्यें कसा अनर्थ केला ? तो मध्येंच लखनौ सोडून कानपूरकडे कां चालता झाला ?





प्रकरण बाविसावें

# बिहारच्या सिंहाचा अंत



**मा**णूस सूर्याच्या उन्हाला भिऊन सूर्याकडे पाठ फिरवून सावलीला पकडण्यासाठीं पळूं लागला कीं तो पळतांना त्याला वांकुल्या दाखवीत सावली त्याच्यापुढें पळते. पण तोच माणूस सूर्याला न भितां समोरासमोर सामना दिल्यासारखा सूर्यापुढें चालूं लागला कीं सावली त्याच्या पायाच्या दासीसारखी त्याच्या पावलांच्या आसऱ्यानें मुकाटपणें त्याच्या मागोमाग येते. ' बिहारचा सिंह ' राणा कुमारसिंह हा असाच निर्भयपणें इंग्रजांना सामना देण्याची तयारी करीत वनसंचार करीत होता. म्हणूनच लोकांचा पाठिंबा त्याच्या पावलांच्या सावलीसारखा त्याच्या मागोमाग रानावनांतून वाट चालत होता. मेजर आयर राण्याच्या जगदीशपूरच्या राजवाड्यांत आयत्या बिळांत नागोबासा बसून राण्याची शिकार केव्हां साधते ह्याची वाट पाहात होता.

सन १८५७ च्या जुलैअखेरपासून इंग्रज आणि बिहारचें प्रतीक असा जगदीशपूरचा हा वृद्ध राणा, ह्यांच्यांत हा गनिमी काव्याचा अरण्यसंगर चालला होता. परंतु इंग्रजांना राणा कांहीं केल्या कोंडतां येईना.

एक दिवस नव्हे, दोन दिवस नव्हे, चांगले उणेपुरे दहा अकरा महिने हा संग्राम चालला होता. बिहारचें अरण्य गनिमी काव्याच्या लढाईला अतिशय सोयीचें. पण तें सोयीचें कोणाला? गनिमी काव्यानें लढण्यांत जे पटाईत असतील त्यांना. राण्याच्या निशाणाखालीं जमून इंग्रजांशीं लढणारी बिहारी क्रांतिसेना एरव्हीं अगदीं रांगडी खरी. विलायती युद्धकवाईत तिला तितकीशी अवगत नव्हती खरी. तरी ती असल्या डावपेचांच्या लढाईत मोठी निपुण आणि चिवट. अशी चिवट सेना बरोबर घेऊन राण्यासारखे बिहारचे आणखी अनेक शूर जमीनदार, तालुकदार अरण्याच्या आश्रयाला गेले होते. इंग्रजी अंमल बिहारमधून समूळ नाहींसा झाल्याखेरीज आपली धडगत नाहीं अशी त्यांची बालंबाल खात्री होऊन चुकली होती. म्हणून ते सारे कधीं नव्हत्याचे राण्याच्या निशाणाखालीं आपापल्या रांगड्या सेना पाठवून राण्याच्या बळानें इंग्रजांशीं सामना देत होते. बिहारची क्रांतिसेना राणा कुंवरसिंह वनवासाला निघाला तेव्हांच दहा दिशांना पांगली होती. तरीही रांगड्या वानरसेनेच्या बळावर रावणवधाला निघालेल्या वनवासी रामासारखा राणा त्या तुटपुंज्या रांगड्या अनुयायांना पाठीशीं घालून रानवनांतून इंग्रजांशीं झगडत होता.

राणा लढतां लढतां जखमी होत होता. त्याची उपासमार होत होती. आयुष्यांत कधींही यातना कशा असतात त्या ज्याला माहीत नाहींत, त्याला जणूं यातनाच खाऊन पिऊन रानावनांत जगावें लागत होतें आणि जगण्या-साठीं झगडावें लागत होतें. त्याच्याबरोबरची सेना हालअपेष्टा भोगीत मरणाच्या जबड्यांत उभी राहून स्वातंत्र्यासाठीं मरतां मरतां झगडत होती. अशी लढत महिनेच्या महिने देत कुमारसिंह हळूहळू जगदीशपूरची वाट चालत होता. सिंहाच्या गुहेंत कुत्रा येऊन आरामांत झोपलेला त्याला पाहवत नव्हता.

त्याला आतां कळून चुकलें होतें कीं विजयश्री आपणावर रुसली आहे. आपल्या मायभूमींत इंग्रजांचीं 'शंभर वर्षें' अजून भरलेलीं नाहींत. आपलें राजवैभव जें एकदा लुबाडलें गेलें, तें आपल्या डोळ्यांदेखत तरी पुन्हा आपल्या हातीं येणार नाहीं, हें राण्याला आतां कळून चुकलें होतें.

बिहारांतील ती मोहीम बळावत चालली, वाढत चालली, तसे ते गोरे शिकारी कुत्रे लांबचा पल्ला गांठीत सिंहाचा पाठलाग करीत सिंहाची गुहा सोडून धावत होते. त्यांना राण्याचा रानावनांत वास येई. त्या वासावर ते त्याची शिकार करायला जीव तोडून धावत. परंतु त्यांना राण्याची सावली दिसली तरी भयंकर जखमी होऊनही तो कधींच त्यांच्या हातीं लागला नाहीं.

असा निकराचा सामना शत्रूशीं देत देत शत्रूचा संहार करीत राणा कुमारसिंह अखेर सन १८५८ च्या एप्रिलच्या २३ तारखेला आपल्या संकल्पाप्रमाणें जगदीशपूरच्या आपल्या राजप्रासादांत येऊन पोचला. तो आला तो पराजित भ्याडासारखा चोरून आला नाहीं. भयंकर जखमांनीं शरीराची चाळण झालेला, पण शूरासारखा–राजासारखा यशस्वितेनें मिरवत आला. आला तोही राज्य करण्यासाठीं जगलाच नाहीं. आपल्या जन्मभूमींत आपल्या पांढरीमायेच्या मांडीवर मस्तक टेकून शूराचें अभिमानास्पद मरण मरण्यासाठीं आला ! आला, आणि तीन दिवसांनीं त्याचा अंत झाला.

## स्वाध्याय

१. बिहारमध्यें राणा कुमारसिंहाचा लढ्याचा पवित्रा कसा होता ?
२. त्या सामन्यांत बिहारचे सारे जमीनदार राणा कुमारसिंहाच्या झेंड्याखालीं कधीं नव्हत्याचे येऊन कां उभे राहिले ?
३. बिहारच्या लढ्यांत राणा कुमारसिंहाचे कसे हाल झाले ?
४. 'सिंहाच्या गुहेंत कुत्रा येऊन झोपलेला' कोण ?
५. बिहारच्या राण्याची अखेरची इच्छा काय होती ?





प्रकरण तेविसावें

# मौलवी अहंमदशाहाचा खून !

⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙ ⊙

लखनौ तर पडलें. आतां पुढें ?.... आपल्या जीवितकार्याची दुर्दशा आपल्या डोळ्यांदेखत पाहाणें आतां अत्यंत दु:खकारक असतें. तें कठीण कर्म मौलवी अहंमदशाहाच्या वांट्याला आलें होतें.

पण तरीही तो धीर वीर अवलिया डगमगला नाहीं. लखनौहून तो जो नाइलाज म्हणून परागंदा झाला, तो गिरिकुहरांत कोठे तरी काळोख्या ढोलींत बसून मरेपावेतों मेलेलें जिणें जगण्यासाठीं नव्हे. पायाला भिंगरी बांधल्यासारखा तो साऱ्या अयोध्या प्रांतांत मावळूं लागलेल्या क्रांतिसंग्रामाला नवजीवन देण्यासाठीं देवदूतासारखा संचार करीत होता. प्रचार करीत होता. कारस्थानें करीत होता. फसत चाललेल्या स्वातंत्र्यसंग्रामाला राजामहाराजांची मदत मिळवण्यासाठीं जिवाचें रान करीत होता.

मौलवी शूर, चतुर आणि स्वदेशाभिमानी खरा, पण मनाचा गंगाजलासारखा निर्मळ. त्याला वाटे, आपल्या मायभूच्या दास्यविमोचनांत अंगचुकारपणा करील असा कोणी करंटा भारतसंतान कसा असेल? आणि राजेमहाराजे मातबर लोक तर कधींच तसे असणार नाहींत. कारण हा संग्राम भारताच्या आम जनतेचा असला, तरी त्यांत राजेमहाराजांचेच हितसंबंध अधिक खोलवर गुंतलेले होते. इंग्रजानें ह्या राजेमहाराजांचीं राज्यें सफा बुचाडून घेऊन त्यांना सफा बुडविलें होतें. स्वातंत्र्यसंग्रामांत यश मिळतें, तर त्यांना त्यांचें गेलेलें राजवैभव पुन्हा उपभोगायला मिळणार होतें. जनतेचें काय? जनता अमर आहे. आजवर किती राजेमहाराजे आले आणि गेले. जनता सदैव सर्वांना पुरून उरली आहे. जनता पूर्वींच्या मस्तवाल राज्यकर्त्यांना उलथून पाडीत आली, तशी वेळ आली तर ह्या इंग्रज राज्यकर्त्यांनाही उलथून पाडायला ती थोडीच कचरणार होती! आणि कचरली थोडीच?

मौलवी क्रांतियुद्धाची जी नवी जुळवाजुळव करीत होता, तीदेखील स्वतःच्या नांवानें नव्हे. अयोध्येची राज्यारूढ बेगम हजरत महाल हिच्या नांवानें. त्याला कोणीं सांगितलें कीं पोवेनचा राजा मदत करूं शकेल. लगेच तो पोवेनच्या राजाला बेगमेचा दूत म्हणून भेटायला निघाला. त्या अडचणीच्या अवघड प्रदेशांत तेव्हां पायीं अथवा घोड्यावरूनही प्रवास करण्याची सोय नव्हती. म्हणून मौलवी नेहमीं हत्तीवरून प्रवास करी. दूर जंगलांत हत्ती उभा करून त्यानें पोवेनच्या राजाकडे भेटीची परवानगी मागण्यासाठीं जासुदाहातीं निरोप पाठविला.

"अवश्य. मौलवींना भेटीला येऊं द्या. मलाही त्यांची भेट घेण्याची इच्छा आहेच." असा राजानें मौलवीच्या निरोपाला उत्तेजनपर जबाब पाठविला. मौलवीला आपण जिवंत अगर मेलेला पकडून दिला तर आपणाला कंपनीसरकारकडून काय बक्षीस मिळेल, ह्याच्या वाटाघाटी राजानें त्याच दिवशीं एका इंग्रज अधिकाऱ्याशीं केल्या होत्या.

मौलवीला राजाचा जबाब ऐकून आनंद वाटला. तो हत्तीवरून राजाच्या पोवेन गांवीं आला. पण पाहातो तों त्या तटबंदी गांवाच्या वेशीचे दरवाजे बंद ! तटावर मात्र सशस्त्र शिपायांचा पहारा आणि त्या पहाऱ्यांत तो राजा आणि त्याचा भाऊ असे दोघे उभे !

तेव्हां मात्र मौलवीला प्राप्त प्रसंगाची अंधुक कल्पना आली. तरीदेखील त्यानें त्याचा वाकडा अर्थ मनांत आणला नाहीं. त्यानें बाहेरून हत्तीवरून राजाला बेगमेच्या वतीनें आपला मनोदय कळविण्याला सुरुवात केली.

परंतु राजा तेथें मौलवीचा मनोदय ऐकून घेण्यासाठीं सशस्त्र शिपाई घेऊन उभा नव्हताच. तो मौलवीला आपणाशीं बोलण्यांत बेसावधपणें गुंतवून ठेवूं पाहात होता इतकेंच.

मौलवीनें राजाचा कावा ओळखला आणि कोरड्या बोलण्यांत वेळ न दवडतां आपल्या हत्तीला इशारा दिला. हत्ती तटाच्या दरवाजावर धडका घेऊं लागला. मौलवी जरी परागंदा होता, तरी अनाथासारखा अगदींच उघड्यावर पडला नव्हता. त्याचे कांहीं अनुयायी माघारे दूरवर झाडींत उभे होते. वेळ पडली असती, तर ते राजाच्या लोकांशीं सामना देण्यालाही कमी करते ना.

पण तितका अवसरच मिळाला नाहीं. मौलवीचा डाव ओळखून तटावरून राजाच्या भावानें मौलवीवर नेम धरून गोळी झाडली. गोळी वर्मी लागली आणि मौलवीचें कलेवर हत्तीवरून खालीं कोसळलें.

लगेच स्वतः राजा तरवार घेऊन तटाबाहेर धावत आला. त्यानें मौलवीचें शीर कापून घेतलें आणि तसेंच तें रक्तानें थबथबलेलें मुंडकें घेऊन तो आपल्या हत्तीवरून धावत तेथून तेरा मैलांवर असलेल्या इंग्रज ठाण्याकडे निघाला. मौलवी ठार झालेला पाहून त्याचे अनुयायी भयभीत होऊन तसेच जंगलांत दूरवर पळून गेले.

राजाचा ह्या बहादुरीबद्दल ठाण्यावरील इंग्रज अधिकाऱ्यानें गौरव केला. आणि ह्या कामगिरीबद्दल राजाला अर्धा लाख रुपये इनाम द्यावे अशी त्याच्यादेखत वरिष्ठांकडे तांतडीची शिफारस केली.

मौलवी ठार झाला असें पाहून इंग्रजांनाही आपल्या मागची एक भयंकर मोठी ब्याद गेल्यामुळें हायसें वाटलें.

अयोध्येंतील क्रांतिसंगराला प्रकाश देणारी ही अखेरची दीपज्योत मालवली ! आणि सर्वत्र अंधारी अंधार झाला.

### स्वाध्याय

१. मौलवी अहंमदशाहानें क्रांतीच्या पडत्या काळांतही क्रांति यशस्वी होण्यासाठीं कशी जिवापाड धडपड केली ?
२. पोवेनच्या राजानें मौलवीला कसा दगा दिला ?
३. मौलवीला दगा देऊन ठार केल्याबद्दल इंग्रजांनीं राजाचें कसें कौतुक केलें ?





प्रकरण चोविसावें

# राणी लक्ष्मीची आहुति



सन १८५७ च्या जूनच्या ४ तारखेपासून राणी लक्ष्मी झांशीचें राज्य करीत होती. क्रांतिसंग्रामाच्या प्रथमचरणींच तिनें ‘ खालसा ’ झांशीवरची कंपनीसरकारची सत्ता उखडून टाकून ‘ झांशीची राणी ’ म्हणूनच केवळ नव्हे, तर क्रांतिसिद्ध भारताची राणी शोभत इंग्रजांची झांशी ‘ खालसा ’ केली होती. तें सारें वर्ष संपेपावेतों राणीची स्वातंत्र्यसत्ता झांशीवर चालत होती.

राणी वयानें अगदीं लहान, अवघी बावीस वर्षांची तरुण विधवा. पण मी मी म्हणणाऱ्या राजकारणपटूंनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घालावीं, इतकी ती राजकारणकुशल. इंग्रजांकडील सूत राखण्यासाठीं तिनें चतुराई-पूर्वक कंपनीसरकारच्या अधिकाऱ्यांना साळसूदपणें कळवून ठेवलें होतें,

"बंडखोर झांशी बळकावीत होते, म्हणून कंपनीसरकारच्या वतीनें मी तिचें रक्षण करीत आहें."

पण कंपनीसरकार अग्नीलाही जाळणाऱ्या तेजाबासारखें राणीचें वरून दिसायला सोज्वळ पण अंतरींचें भयंकर दाहक स्वरूप ओळखून होतें. झांशी-बुंदेलखंडच्या टापूंत हुकमी पत्त्यांसारखें यश मिळवून क्रांतिकारक इंग्रजांच्या ताकाला तूर लावूं देत नव्हते. ही इतर ठिकाणच्या क्रांतिकारकांत सगळीकडे न आढळणारी हिंमत झांशीच्या टापूंतील क्रांतिकारकांतच कोठून आली, हें इंग्रजांना कोणीं सांगायला नको होतें. परंतु सारें आकाशच फाटलें होतें; तेथें त्या फाटलेल्या आकाशाला एकाच वेळीं सर्व ठिकाणीं बलाढ्य इंग्रज झाले तरी कोठवर ठिगळें लावणार?

ती सर्वत्र चिघळलेली परिस्थिति काबूंत आणायला इंग्रजांना पुढील सालचा जानेवारी महिना उजाडला. आतां बंडाचा नायनाट करून इंग्रजी अंमल भारतभर पुन्हा भरभक्कम स्थापन करण्याची कंपनीसरकारची सर्वांगीण योजना निश्चित झाली. उत्तरेकडील क्रांतीनें झपाटलेला मुलुख सोडविण्याची कामगिरी कॅम्बेलनें शिरावर घेतली होती. त्यानें दुआब जिंकून घेतला. असा जम बसवीत गंगानदी ओलांडून तो लखनौवर चालून गेला. लखनौचा क्रांतिकारकांचा अंमल समूळ मोडून काढून तो तसाच रोहिलखंडांत शिरला. असें, क्रांतिकारकांना त्यानें उत्तरेपासून नाकेबंदी करीत लखनौपावेतों कोंडून झोडपीत आणलें. हिमालयापासून गंगायमुना-पावेतों क्रांतिकारकांना त्यानें कोठें निवाऱ्याची अशी तसूभरही जागा ठेवली नाहीं.

उत्तर अशी कॅम्बेलनें सांभाळली आणि दक्षिण सर ह्यू रोजनें सांभाळली. तोही यमुना आणि विंध्याचल ह्यांच्या मधला प्रदेश झपाट्यानें सोडवीत जिंकीत दक्षिणेकडे चालला.

उत्तरेंत जसे तांदळांत खड्यांसारखे शीख, गुरखे आणि कांहीं राजे-रजवाडे होते, तसे फारसे नाहीं पण थोडे तरी लोकांवर अंमल गाजविणारे

इंग्रजधार्जिणे गणंग राजे दक्षिणेंतही हैदराबाद, भोपाळ असे होते. संस्थानें म्हटलीं कीं तीं बहुश: इंग्रजी अंमलाची तळी उचलून धरणारीं. जीं झांशी-साताऱ्यासारखीं, तशी तळी उचलून धरणारीं नव्हतीं, तीं इंग्रजांनीं मुद्दाम आणलेल्या ‘ खालसा ’ च्या महामारींत टिकतातच कशाला ? रोजला हें ह्या संस्थानिकांचें पाठबळ, आणि शिवाय मद्रास-मुंबई-अहमदाबादची सरकारी फौज त्याच्या दिमतीला होतीच. त्यांत आणखी जानेवारीच्या ६ तारखेला ब्रिगेडियर व्हिटकॉक हा खंबीर सेनानी रोजला मदतनीस म्हणून जबलपूरच्या वाटेनें अंमल बसवीत येऊं लागला.

आतां झांशीच्या सिंहिणीची गुहा व्यापायला हरकत नाहीं अशी रोजची खात्री झाली. राणीचें सामर्थ्य ओळखूनच रोजनें कॅम्बेलच्या सहकार्यानें दूरदर्शीपणानें झांशीसभोंवारचा मुलूख असा मोक्याचीं ठिकाणें साधून अगोदर काबूंत आणला आणि क्रांतिकारकांचें त्या टापूंतून उच्चाटण केलें. राणी-नानासाहेबांदि थोर सहकाऱ्यांच्या मार्गदर्शनाखालीं विणलेलें क्रांतीच्या गुप्त कटकारस्थानांचें जाळें त्यानें जागोजागीं तोडून निकामी करून सोडलें. त्यामुळें राणीची झांशींत कोंडी झाली. पंख तोडलेल्या गरुड पक्षिणीसारखी तिची अवस्था झाली.

“ बस ! आतां ह्या सिंहिणीच्या गुहेंत शिरायला हरकत नाहीं. ” असा रोजनें विचार केला आणि तो झांशी घेऊन काल्पीकडे कूच करण्याचा बेत आंखून महूहून निघाला.

मार्गांत त्यानें प्रथम रायगड घेतला. मग सागर घेतलें. नंतर सागरवरून जाऊन बाणापूर घेतलें. कारण बाणापूरचा राजा झांशीच्या राणीचा क्रांतिकारक अनुयायी होता. बाणापूर घेतलें तेव्हां तो बाणापुरांत नव्हताच. तो राणीच्या योजनेप्रमाणें क्रांतीची मशाल हातीं घेऊन जनमनाला आगी लावण्यांत गढलेला होता. चंदेरीगडावरचा इंग्रजांचा ताबा उडवून क्रांतिकारकांनीं तेथें कबजा केला होता. तो गडही पुन्हा जिंकून घेतला. असा दिग्विजय करीत रोज झांशीपासून चौदा मैलांवर येऊन पोचला.

जसजशी झांशी जवळ येऊं लागली, तसतसा पायांखालचा मुलुख रोजला अधिकाधिक स्मशानवत् उजाड झालेला दिसूं लागला. ना कुठें चारावैरण, ना अन्नपाणी, ना आसरानिवारा. असें दग्धभू धोरण राणीनें झांशीसभोंवारच्या प्रदेशांत कसोशीनें अंमलांत आणलें होतें. त्यामुळें इंग्रज सेनेची जिकडे तिकडे वाटेंत कमालीची कुचंबणा झाली. तरीदेखील ग्वाल्हेर व तिह्‌री येथील इंग्रजधार्जिण्या राजांनीं त्या ओसाड मुलुखांत कांहीं उणें पडूं दिलें नाहीं, म्हणून वेळ निभावली.

ह्या साऱ्या अडचणी सोशीत निवारीत रोज झांशीला येऊन भिडला. तेव्हां झांशींत त्याच्याशीं मुकाबला करायला राणी आणि तिच्या मदतीला बाणापूर-शहापूरचे राजे, अनेक ठाकूर, बुंदेले सरदार, झांशीचे दिवाण लक्ष्मणराव, राणीचे वडील मोरोपंत तांबे, ही लढवय्ये मंडळी खडी होती.

सेनापति रोजनें कांहीं दिवस राणी गुण्यागोविंदानें शरण येते का म्हणून वाट पाहिली आणि अखेर मार्चच्या २३ तारखेला लढाईला तोंड लागलें.

एकसारखी नऊ दिवस धुमश्चक्री चालली होती. इंग्रजी फौजेच्या माऱ्यानें झांशीच्या मोर्चांची पडझड व्हावी; ती दिवस मावळायला लढाई थंडावली कीं रातोरात राणीनें खास स्वतःच्या देखरेखीखालीं नीट बांधून दुरुस्त करून घ्यावी.

श्रीमंत नानासाहेब पेशवे हा राणीचा मोठा आधार. तो आधार आतां तुटल्यासारखा झाला होता. कानपूर पडल्यापासून नानासाहेबांनीं एक परीनें जगदीशपूरच्या राणा कुमारसिंहासारखाच, किंबहुना त्याहूनही बिकट परंतु कार्यक्षम अज्ञातवास पत्करला होता. ते कोठें आहेत, काय करतात, ह्याची कोणालाही खबर नव्हती. कंपनीसरकार नानासाहेबांना पकडून देणारासाठीं हवी तेवढी पैशांची खैरात करायला तयार होतें. परंतु पैशाच्या लालुचीनें असलें नीच कर्म करणारे नराधम असे काय रस्त्यावर पडले आहेत?

नानासाहेब नाहींत, तरी त्यांचा सेनापति तात्या टोपे आणि पुतण्या रावसाहेब हे अखेरपावेतों राणीला गुप्त सल्लामसलत देत होतेच. नाना-साहेबांच्या अनुपस्थितींत त्यांच्या कारभाराचा भार रावसाहेब पेशव्यांवर पडला होता. तो सांभाळून शक्य तें क्रांतिकार्य रावसाहेबही करीत होतेच.

रोजची धाड झांशीवर गेली असें कळतांच रावसाहेबांशीं संगनमत करून पेशव्यांचा सेनापति तात्या टोपे सैन्य घेऊन राणीच्या मदतीला कानपूरहून निघाला होता. परंतु ती मदत येऊन दाखल होण्यापूर्वींच रोजनें झांशीचें नरडें दाबून कोंडमारा केला होता. तात्या आला; पण उशीर झाला. आणि उशीर झाला नसता, तरी पदरचें सारें लष्करी बळ झांशीवर ओतून झांशी बुडवायला निघालेल्या कंपनीसरकारच्या प्रचंड सामर्थ्यापुढें तात्याचा तरी कसा निभाव लागला असता हा प्रश्नच आहे.

राणीनें आपल्या परीनें झांशी लढविण्याची पराकाष्ठा केली. परंतु तिचाही नाइलाज झाला. इंग्रजांनीं चोहोंकडून झांशी वेढल्यावर राणी तरी कोठवर टिकाव धरणार? झांशी पडली. तेव्हां किल्ल्यांतील सारें साहित्य आणि संपत्ति तशीच टाकून राणी निवडक स्वार व बहुमोल पण सुटसुटीत जडजवाहीर लादलेला हत्ती स्वारांच्या कडक पाहाऱ्यांत बरोबर घेऊन घोडा दौडत रातोरात गड उतरून वेशीपार झाली. आपला नेणता दत्तक बालक तिनें जिवाच्या जतनेनें पाठीशीं बांधून घोड्यावर घेतला होता. तिच्या अंगांत चिलखत होतें. वेष वीरपुरुषाचा होता.

भरधाव घोडा फेकीत राणी एकशें दोन मैलांवर काल्पीला जाऊन जरा विसांवा घेत बसली. तों रोज सैन्यानिशीं तिच्या पाठीवर शिकारी चित्त्यासारखा चालून आलाच. अर्थात् राणीला काल्पींतही थांबून विसांवा घेतां आला नाहीं. तेथून ती नाइलाज म्हणून दुसऱ्या एका घोड्यावर स्वार होऊन निघाली. कारण तिची नेहमींची खात्रीची आवडती घोडी शंभरांवर मैलांच्या अविश्रान्त दौडीनें काल्पींत येतांक्षणीं पोटीं फुटून मरून पडली होती. रोजच्या धडाक्यानें काल्पीचें ठाणेंही तसेंच ताबडतोब पडलें.

"राणीसाहेब! आतां कुठें जायचं?" बरोबरच्या शरीररक्षकानें विचारलें.

"परमेश्वर बुद्धि देईल, वाट दाखवील तिकडे जायचं." राणी उत्तरली आणि जड अंतःकरणानें सर्वांचा अखेरचा निरोप घेऊन घोडदौडीनें निघाली.

तात्या टोपे आणि रावसाहेब पेशवे शत्रूची नजर चुकवून अगोदरच ग्वाल्हेरला जाऊन पोचले होते. ह्या वेळीं मदत करा असें पत्र घेऊन राणीचा जासूदही ग्वाल्हेरच्या शिंदे राजांकडे रवाना झाला होता.

पण ग्वाल्हेरच्या राजानें कांहींच मदत करण्याचें नाकारलें. राणी येऊन पोचण्याच्या आंत राजे आणि त्यांचे दिवाण रावराजे दिनकरराव राजवाडे भिऊन थेट आग्र्याला इंग्रजांच्या आश्रयाला पळाले. त्यांना पेशव्यांचें व राणीचें भय वाटलें!

कांहीं दिवस ग्वाल्हेर शहर रावसाहेब पेशव्यांच्या ताब्यांत होतें. राणीचेंही वास्तव्य तेव्हां ग्वाल्हेरच्या आजूबाजूच्या टापूंत होतें. मिळालेल्या थोड्या सवडीचा उपयोग आपली क्रांतिसेनेची फळी मजबूत करण्याकडे कसा करावा, इकडे तिचें सारें चित्त वेधून राहिलें होतें. शहरांत पेशव्यांनीं फूलबागेंत जूनच्या तीन तारखेला मोठा दरबार भरविला. दरबाराचा थाट पुण्याच्या पेशवाई श्रीमंतीची आठवण करून देणारा होता. दरबारांत सुंदर नवें पेशवाई सिंहासन मांडलें होतें. त्यावर रावसाहेब पेशवे विधिपूर्वक थाटामाटांत आरूढ झाले. नानासाहेब पेशवे आतां बेपत्ता होते.

इकडे हा पेशवाई उत्सवाचा आमोदप्रमोद चालू आहे, तोंच ग्वाल्हेरच्या रयतेचा बुद्धिभेद करण्यासाठीं कीं काय, सर ह्यू रोज ग्वाल्हेरच्या राजाला घेऊन शहरावर चाल करून आला. पेशवाई उत्सव आनंदीआनंदांत चालूच होता. परंतु पेशव्यांना आतां उत्सवांत रंगून राहायला सवड नव्हती. शत्रु अगदीं गळ्याला येऊन भिडला होता. खुद्द ग्वाल्हेरचा राजाही शत्रूच्या ओंजळीनें पाणी पीत होता. ग्वाल्हेरांत राहून आतां पल्ला येणार नव्हता.

आतां काय करावें ? ह्या संकटाला तोंड कसें द्यावें ? रावसाहेब पेशवे अगदीं भांबावून गेले. त्यांतल्या त्यांत त्यांचा सगासोयरा असा एक काय तो बांद्याचा नबाब. थोरल्या बाजीराव पेशव्यांचा तो मस्तानीपासून झालेला पुत्र. बांद्याच्या नबाबानें पोवेनच्या विश्वासघातकी राजासारखें दगलबाजीचें वर्तन केलें नाहीं. त्या राजानें मौलवीचा प्रथम केसानें आणि मग खरोखरच तरवारीनें गळा कापला. तसा कांहींच धोका बांद्याच्या नबाबापाशीं पेशव्यांना नव्हता. परंतु एकादशीच्या घरीं शिवरात्र पाहुणी जावी तशी ती दोघांची भेट. आपण तरी कसे टिकतों ह्या फिकिरींत बांद्याचा नबाब !

तिकडून पेशवे निराश होऊन माघारे येतात, तों ग्वाल्हेरसभोंवार धडाक्यानें रणकुंड पेटलें होतें. आतां शिंद्याविरुद्ध लढाई द्यावी, तर त्याची तत्कालीन परंपरेनुसार राजनिष्ठ असलेली रयत आपल्या राजाविरुद्ध परक्या कोणाला शस्त्र उचलूं देणार नाहीं, हें भय. शिवाय राजाचा पाठराखेपणा करायला सर्वसमर्थ रोज शेजारीं उभा होताच.

तात्या टोपे क्रांतिसेनेचा जीव कीं प्राण. तो आपल्या प्रामाणिक हाके-सरसे हवे तेवढे ग्वाल्हेरचे क्रांतिकारक शिपाई इंग्रजांविरुद्ध लढण्यासाठीं उभे करण्याला समर्थ होता खरा, परंतु ती वेळ आतां निघून गेली होती. इंग्रजांनीं ग्वाल्हेरचा मुरार लष्करी तळ ग्वाल्हेरांत पाऊल टाकल्या दिवशींच जिंकून घेतला होता. फितविण्याजोगें, हाक मारून खडें करण्याजोगें सैन्य आतां मुरार ठाण्यावर उरलेंच नव्हतें.

रावसाहेब पेशवे अगदीं गोंधळून गेले. पण राणी लक्ष्मीनें त्यांना धीर दिला. तिनें घाईघाईनें आपलें विखुरलेलें सैन्य एकत्र आणतां आलें तेवढें एकत्र आणलें आणि व्यूहरचना करून आपसांत एकेका फळीची कामगिरी वांटून घेतली. कोटाकी सराईचें नाकें राखण्याची अवघड कामगिरी तिनें आपल्या वांट्याला घेतली आणि रावसाहेबांना सांगितलें, “ श्रीमंत ! माझ्या जीवनसर्वस्वासह मी माझें कर्तव्य पार पाडायला तयार आहें. आतां आपण आपलं कर्तव्य करा. ”

लगेच ती उठली. आपला लष्करी पेहेराव चढविला. आपली रत्न-जडित तरवार म्यानाबाहेर काढून घोड्यावर स्वार झाली आणि कोटा-की-सराई नाक्याकडे चालली. फक्त मूठभर घोडेस्वार सैनिक तिच्याबरोबर होते. त्यांतच मंदार आणि काशी ह्या तिच्या पाठच्या बहिणीसारख्या शूर दासीही होत्या.

इंग्रजांशीं जिवावर उदार होऊन लढतां लढतां तो दिवस कधीं मावळला हें राणीला कळलेंदेखील नाहीं. इतकी ती रणचंडीचा अवतार धारण करून आत्मभान विसरून लढत होती. मंदार आणि काशी ह्या दोघींनींही त्या दिवशीं आपल्या राणीच्या नांवाला शोभेशी तरवार गाजविली.

तो दिवस गेला. तारीख १८ जून हा दुसरा दिवस उजाडला. इंग्रज सेनापतीनें त्या दिवशीं क्रांतिसेनेच्या राणीचा निःपात करण्याच्या निर्धारानें आपलें ग्वाल्हेरांतील सारें लष्करी बळ रणांगणावर ओतून निकराची चढाई करण्याचा निर्धार जाहीर केला होता. तें इंग्रजांचें आव्हान स्वीकारून आजूबाजूची सारी चतुरंग क्रांतिसेना राणीच्या निशाणाखालीं रणांगणावर पवित्रे मांडून खडी होती.

दोन्ही बाजूंचीं सैन्यें अगदीं मारूं किंवा मरूं अशा निर्धारानें लढत होतीं. सर्वसमर्थ इंग्रजी दळापुढें आपला निभाव लागणार नाहीं, हें राणीलाही कळत होतें. तिच्या खांद्याला खांदा भिडवून लढणाऱ्या सैन्यालाही तें कळत होतें. परंतु तो भीतिदायक विचारही मनांत न आणतां राणी आपल्या तुटपुंज्या पण धीराच्या क्रांतिसेनेला पाठीशीं घालून ईर्षेनें लढत होती.

लढतां लढतां मुख्य सैन्याचा धुव्वा उडाला. तोफखाना बंद पडला. राणीच्या पाठीशीं अवघे पंधरा ते वीस बहादूर स्वार जिवंत उभे होते. काशी आणि मंदार ह्या दोघी दासीही तिच्याबरोबर होत्या.

“आपणाला शत्रूची फळी फोडून पार व्हायचं आहे.” राणीनें आपल्या सैन्याला आज्ञा दिली आणि आपला घोडा दौडविला. इंग्रजांची

सेना ह्या वेळीं तिला कोंडण्याच्या खटपटींत असलेली दिसत होती. थांबायला अवसर नव्हता. एकेक क्षण दसलाखांच्या मोलाचा जात होता.

विजेसारखी तळपत राणी पुढें चालली आहे. तिचे सैनिक त्याच धडाडीनें तिच्याबरोबर चालले आहेत. आणि इंग्रज घोडेस्वार त्यांचा पाठलाग करीत दौडत आहेत. ह्या दौडींत शत्रूला मारतां मारतां घोडेस्वार एकामागून एक बळी पडले. मंदार आणि काशी ह्या दोघी वीरांगनाही तशीच मर्दुमकी गाजवून धारातीर्थी पडून पावन झाल्या. आतां राणी एकटी एक राहिली. तिलाही सर्वांगावर अनेक जखमा झाल्या होत्या. सर्वांग रक्तानें भिजून ओलें चिंब झालें होतें. तरीदेखील ती जो सोजीर घोडेस्वार तावडींत सापडेल त्याला सपासप कापीत घोडा दौडीत पुढें चालली होती. तोंच एक सोजीर घोडेस्वार तिच्यावर चित्त्यासारखी झडप घालीत तरवार परजीत दौडत चालून आला. राणी पुढें आणि तो स्वार मागें अशी ती धावती लढाई लढतां लढतां मार्गांत एक ओढा लागला आणि राणीचा घोडा अडला. पाण्यालाही न भितां धडाक्यानें पोहून पुढें जाणारी ती तिची नेहमींची घोडी नव्हती. ती काल्पीच्या वाटेवर मागेंच ठार झाली होती. ह्या नव्या घोड्याला तसा सराव नव्हता.

घोडा अडला. राणी जर धडाक्यासरशी त्या ओढ्यापार होती, तर त्या कर्दनकाळ सोजिराच्या हल्ल्यांतून नक्की बचावून मोकळी सुटती. पण घोडा अडला. राणीनें जोरानें टांचा मारतांच तो स्वतःसभोंवार रिंगण धरूं लागला. राणीचा नाइलाज झाला. तेवढ्यांत तो इंग्रज सोजीर अगदीं जवळ येऊन भिडला. तो एकटाच नाहीं, त्याच्याबरोबर त्याचे आणखी दोघे साथीदार स्वार दौडत येऊन भिडले.

आतां राणी जिवंत सुटणें अगदीं अशक्य होतें. परंतु तरीदेखील शरणागति राणीच्या ध्यानींमनींही आली नाहीं. त्या सोजिरांनीं तिच्यावर तरवारी उपसल्या, तशी तिनेंही त्यांच्यावर तरवार उपसली. कांहीं क्षण तरवारींचा खणखणाट झाला. एक घाव राणीच्या मस्तकावर पडला. त्यासरशीं

मस्तकाची उजवी बाजू तुटली. उजवा डोळाही त्या घावासरसा उखडून निघाला. तोंच दुसरा वार तिच्या छातीवर पडला. राणी मृत्यूच्या खोल दरींत कोसळली. तरी पडतां पडतां तिनें आपला जीव घेणाऱ्या त्या सोजिराचा तरवारीच्या घावासरसा बळी घेतलाच! आणि मगच तिनें प्राण सोडला!

सत्तावनी क्रांतियज्ञांत राणी लक्ष्मीची अशी आहुति पडली.

अशी राणी लक्ष्मीची आहुति पडलेली पाहून सर ह्यू रोजनें आणि कंपनीसरकारच्या सर्व बड्यांत बड्या मुलकी व लष्करी गोऱ्या अधिकाऱ्यांनीं हायसा उसासा सोडला.

"आतां आपली इंग्रजी साम्राज्यसत्ता हिंदुस्थानांत सुखरूप टिकली असें म्हणायला हरकत नाहीं." कंपनीसरकार आपल्या अनेक अधिकारी मुखांनीं खात्रीलायक भाषा बोलूं लागलें.

"पण हिंदुस्थानांत इंग्रजी राजवट जाळून भस्मसात् करूं पाहाणाऱ्या क्रांतिकुंडांतील एक निखारा, तो राखेखालीं झाकला गेला असला तरी, अजून आंतल्या आंत धगधगतो आहे. तो केव्हां कसा पेट घेईल आणि काय अनर्थ करून सोडील ह्याचा भरंवसा नाहीं. तो गांठून विझवल्याखेरीज हें संकट दूर झालें असें समजूं नका." दुधानें तोंड भाजल्यामुळें ताकही फुंकून पिणारा एक लष्करी गोरा बोका आपल्या गोऱ्या बांधवांना हितोपदेश करूं लागला.

ही दहशत नरवीर तात्या टोपेविषयीं होती. ते कंपनीसरकारचे बडे अधिकारी तात्याचें नांव ऐकतांक्षणीं असे दचकत होते.

### स्वाध्याय

१. इंग्रजांची झांशी राणीनें केव्हां व कशी 'खालसा' केली होती? तिकडे इंग्रजांना सात आठ महिने कां लक्ष देतां आलें नाहीं? तोंवर त्यांनीं काय केलें?

२. क्रांति ओसरतांच पुन्हा भारतावर इंग्रजी अंमल बसविण्यांत कॅम्बेलची कामगिरी कोणती ?

३. दक्षिणेंत पुन्हा इंग्रजी अंमल मजबूत करण्याच्या कामगिरीवर कोणाची नेमणूक झाली होती ? त्यानें आपली कामगिरी कशी केली ?

४. झांशीच्या राणीचा रोज व कॅम्बेल ह्यांनीं आरंभापासून कसा कोंडमारा केला ?

५. झांशींत राणीची इंग्रजांशीं मुकाबला करण्याची काय तयारी होती ?

६. राणीला कुणाची कशी मदत होती ?

७. झांशी पडल्यावर राणीनें काय केलें ?

८. झांशी सोडल्यानंतरचें राणीचें धावतेंपळतें कष्टमय जीवन वर्णन करा.

९. ग्वाल्हेरच्या बाबतींत राणीची अपेक्षा काय होती ? ती पूर्ण झाली का ? ग्वाल्हेरांत काय झालें ?

१०. रावसाहेब पेशव्यांनीं ग्वाल्हेरांत बसून काय केलें ?

११. बांद्याचा नबाब हा पेशव्यांचा सगासोयरा कसा ?

१२. ग्वाल्हेर येथील संकटांत राणीनें पेशव्याला धीर कसा दिला ? निकराच्या लढ्याची कशी आंखणी करून दिली ? आणि स्वतः कोणतें अभिवचन दिलें ?

१३. अखेरची लढाई लढायला जातेवेळचें राणीचें वर्णन करा.

१४. राणी आणि इंग्रज ह्यांच्यांतील तुंबळ रणसंगराचें वर्णन करा.

१५. राणी लक्ष्मीची अखेर कशी झाली ?





प्रकरण पंचविसावें

# व्हिक्टोरिया राणीचा जाहीरनामा



तेलाविणें विझूं लागलेल्या पेटत्या दिव्याची वात पेटून पेटून किती वेळ पेटणार आणि प्रकाश देणार ? इंग्रज अधिकाऱ्यांनीं तात्याला पकडून कायदेशीरपणें नष्ट करण्याचे भगीरथ प्रयत्न केले. त्या प्रयत्नांना कांहीं यश येईना. परंतु मग कांहीं दिवसांनीं कंपनीसरकारला तात्याची फारशी भीति वाटेनाशी झाली होती. ते तात्याकडे दुर्लक्ष करून सत्तावनी क्रांतीची राख सावडण्याच्या उद्योगाला लागले.

आतां पुढें काय ? १८५७ ची देशव्यापी आग तर विझली. आतां आणखी किती दिवस हिंदी जनतेला असल्या लष्करी हाणामारीच्या तापल्या तव्यावर उभें ठेवणार ?

हिंदुस्थानांत व तिकडे विलायतेंतही ह्याविषयीं कसून सरकारी विचार-विनिमय झाला आणि अखेर ठरलें कीं हिंदुस्थानांत इंग्रजी सत्तेविषयीं

आपुलकी आणि विश्वास वाटेल अशी कांहींतरी चित्ताकर्षक गोष्ट करावी. आणि ती राणीचा जाहीरनामा काढून समारंभपूर्वक हिंदुस्थानला राणीची उदार देणगी म्हणून बहाल करावी. इंग्लंडच्या गादीवर तेव्हां व्हिक्टोरिया राणी राज्यकर्ती होती.

हा जाहीरनामा हिंदी जनतेच्या कल्याणासाठीं काढणार अशी सुस्वर हाकाटी राणी लक्ष्मीच्या अवसानानंतर थोड्याच दिवसांत हिंदुस्थानांत सुरू झाली. लोकही सत्तावनी आपत्तीमुळें अगदीं हैराण झाले होते. जयाची अंधुक तरी आशा दिसत असती, तर बहादूर हिंदी रयतेनें स्वातंत्र्यासाठीं मारूं अथवा मरूं पण माघार घेणार नाहीं असा पक्का निर्धार दाखविला असता. पण तशी आशा करायला आतां स्वप्नांतही अवसर उरला नव्हता. स्वातंत्र्यापायीं शूराचें मरण आतां मागूनही कोणाला तूर्त तरी लाभण्याची शक्यता नव्हती. मग विनाकारण कोंबड्या-बकऱ्यांचें नेभळें अर्थशून्य मरण उगीच कां मरा ? असलें मरण लोकांना नको होतें. त्यांना हायसे उसासे सोडीत पुढील संधीची वाट पाहात शांतपणें जगायला हवें होतें. त्यासाठीं सारे लोक राणीच्या जाहीरनाम्याकडे डोळे लावून होते.

पण राणीचा जाहीरनामा जो निघूं घातला होता, तो खरें पाहातां हिंदुस्थानांत ढांसळलेल्या इंग्रजी साम्राज्यसत्तेची डागडुजी करून ती सत्ता अधिक बळकट करण्यासाठीं निघूं घातला होता. ठेंच लागल्यानंतर जें शहाणपण इंग्रजांना सुचलें, तें जमेला धरून हिंदुस्थानांतील इंग्रजी साम्राज्याची अधिक पायाशुद्ध मजबुती करण्याचा तो साखरघोळ इंग्रजी डाव होता. ‘ अठराशें सत्तावन ’ क्रांति हिंदुस्थानांत कां व कशी भडकली, ह्याचा कार्यकारणभावानें खोलवर विचार करून त्या जाहीरनाम्याची मांडणी करण्यांत येत होती.

काय ? ईस्ट इंडिया कंपनीसरकारची हिंदुस्थानांत सर्वतोपरी अगदीं नापत झाली आहे ? ठीक आहे. हिंदुस्थानवर राज्य करण्याचा कंपनी-

सरकारचा अधिकार रद्द करा. आणि इंग्लंडच्या राणीला हिंदुस्थानची बादशाहीण करून राज्यकारभार तिच्या हातीं द्या.

काय! डलहौसीनें भराभर देशी संस्थानें खालसा करण्याची दंडेली गाजविली म्हणून संस्थानिक चिडले आणि सरकारवर उलटले? ठीक आहे. गिळलेल्या संस्थानांबद्दल ढेकर देऊन उदार मनानें जाहीर करा कीं सरकारनें हिंदी संस्थानिकांशीं जे करारमदार केले आहेत ते सरकार ह्यापुढें योग्य प्रकारें विश्वासानें पाळील. तसेंच त्यांना मानानें वागवील.

काय? आमच्या सुधारणाकायद्यांनीं आणि काडतुसांनीं हिंदी लोकांच्या धर्मांत ढवळाढवळ केली असें लोकमत आहे? ठीक आहे. हिंदी लोकांना अघळपघळ आश्वासन द्या कीं लोकांच्या धार्मिक बाबतींत सरकार कधींही सक्ति अथवा ढवळाढवळ करणार नाहीं.

काय? जमीनजुमला धारण करणाऱ्या जमीनमालक वतनदारांना व जमीनदारांना आमच्या सरकारचा भरंवसा वाटत नाहीं? ठीक आहे. लोकांना जाहीर करा कीं त्यांचा जमीनजुमला वंशपरंपरेनें त्यांच्याकडे ठेवला जाईल.

काय? सरकारी नोकऱ्या वशिलेबाजीनें आणि पक्षपात करून दिल्या जातात अशी ओरड झाली आहे. ठीक आहे, जाहीर करा कीं कोणताही धर्मभेद, जातिभेद, अथवा वर्णभेद विचारांत न घेतां सर्वांना त्यांच्या पात्रतेप्रमाणें अधिकाराच्या जागा दिल्या जातील.

अशा स्पष्ट आशयाचा व्हिक्टोरिया राणीचा जाहीरनामा तारीख १ नोव्हेंबर, १८५९ रोजीं अलाहाबाद येथें मोठा टोलेजंग दरबार भरवून दरबारांत सर्वांना जाहीरपणें वाचून दाखविण्यांत आला.

त्या दिवसापासून हिंदुस्थानांत कंपनीसरकारचा अंमल नष्ट झाला आणि इंग्लंडच्या राणीचा म्हणजेच हिंदुस्थानच्या बादशाहिणीचा राज्यकारभार सुरू झाला. ईस्ट इंडिया कंपनीसरकार विसर्जन पावलें.

परंतु कंपनीसरकार विसर्जन पावलें, तरी शेण पडलें, तें माती घेतल्याशिवाय उठलें नाहीं. हिंदुस्थानला अडीचशें वर्षें गिळून खाऊन धनकुबेर बनलेल्या कंपनीच्या गोऱ्या भागीदारांचें जें प्रचंड भांडवल पठाणी अथवा मारवाडी कर्जासारखें हिंदुस्थानांत गुंतलें होतें, तें राष्ट्रीय कर्ज म्हणून हिंदुस्थानच्या माथीं मारण्यांत आलें.

## स्वा ध्या य

१. राणीच्या जाहीरनाम्याची कल्पना इंग्रज सरकारला कां सुचली? ती योजना कशी ठरली?
२. सत्तावनी आवर्तामुळें हिंदी जनता हैराण झाली होती ती कां? क्रांति यशस्वी होत आली असती, तर लोकांना काय वाटलें असतें?
३. शूराचें मरण आणि कोंबड्या-बकऱ्यांचें मरण ह्यांत अंतर काय?
४. राणीच्या जाहीरनाम्यामुळें हिंदी जनतेला काय काय आश्वासनें मिळालीं? भारताच्या राज्यकारभारांत कोणता महत्त्वाचा बदल झाला?
५. जाहीरनाम्यांतील कलमांवरून त्या त्या बाबतींत भारतांत १८५७ च्या पूर्वी काय परिस्थिति होती?





प्रकरण सव्विसावें

# अखेरची ज्योत मालवली !



असल्या जगण्यापेक्षां मरण बरें, असें धीरवान माणसालाही म्हणायला लावणाऱ्या हालअपेष्टा भोगीत वनवासी नरवीर तात्या टोपे रानावनांत, घनघोर जंगलांत वणवण करीत उमेदीनें जगत होता. त्याला वाटे कीं हा अंधार अमावास्येचा असला तरी तो संपेल आणि ही भयाण रात्र मावळून दिवस उगवेल. त्याला माहीत नव्हतें कीं हा अमावास्येच्या रात्रीपूर्वीचा पडता अंधार होता !

रानावनांत वणवण करतांना तात्याला राणीचा जाहीरनामा टोलेजंग सरकारी दरबारांत जाहीर झाल्याचें कळलें. त्यासरसा त्याच्या साऱ्या उमेदीचा मोहोर पार जळून गेला.

'कशाला जगायचें आतां ? मला देव आतां लौकर मरण देईल तर बरें होईल. मरायचेंच, तर शत्रूच्या हातीं सांपडून अपमानाचें मरण तरी माझ्या नशिबीं येऊं नये.' तात्याला वाटूं लागलें.

त्याला काय माहीत कीं तसेंच अपमानाचें मरण आपल्या कपाळीं आहे म्हणून ?

तात्या टोपे खरा शूर व स्वामिनिष्ठ. देवाघरचा शिपाई. नानासाहेब पेशवे कारभार पाहात होते तोंवर त्यानें त्यांची एकनिष्ठेनें सेवा केली. स्वातंत्र्यसंगरांत दान उलटें पडलें, नानासाहेबांचा डाव फसून त्यांना अज्ञातवासांत परागंदा व्हावें लागलें, तरी पेशव्यांचा सेनापति ह्या नात्यानें तात्या स्वामिनिष्ठेनें इंग्रजांशीं लढत होताच. रावसाहेब पेशवे हे शेवटच्या बाजीराव पेशव्यांच्या दुसऱ्या दत्तक पुत्राचे दत्तक चिरंजीव. पण त्यामुळें आऊचा काऊ तो माझा मावसभाऊ असला पेशवाईवारशाचा दूरान्वय तात्याच्या मनाला शिवलादेखील नाहीं. नानासाहेबांच्या ठायीं रावसाहेब पेशवाई कारभार पाहूं लागले. त्यांच्याशींही तो नानासाहेबांशीं वागे तितक्याच निःसीम स्वामिनिष्ठापूर्वक सतत वागत होता. झांशीच्या राणीच्या मदतीला तो आला, तोही रावसाहेबांची आज्ञा घेऊन. ग्वाल्हेरच्या रणमैदानावर तो लढला, धन्याची आज्ञा होती म्हणून. रावसाहेब ग्वाल्हेरला सिंहासनावर बसले, तेव्हां हा आपला राजा म्हणून त्यांना राजनिष्ठ तात्याचा मानाचा मुजरा मिळाला.

दुर्दैवानें ग्वाल्हेरच्या रणमैदानांत क्रांतिकारकांचा झालेला पराजय आणि राणीचा अंत, म्हणजेच सत्तावनी क्रांतीचा शोकजनक अंत होय.

परंतु देवाघरचा शिपाई तात्या टोपे तसें मानून स्वस्थ बसला नाहीं. रावसाहेब पेशवे अखेर इंग्रजांच्या हातीं सापडले. ते सियालकोटच्या आसपास भटकत असतांना एका मराठी इसमानेंच ती बातमी इंग्रजांना दिली. त्यामुळें ते अचानक पकडले गेले. त्यांना फांसावर चढविलें गेलें. तरी तात्या गनिमी काव्यानें लढतच होता.

आतां तात्याला कोणी हटकता धनी उरला नव्हता. पण तो पेशवे राजांचा सेवक व सेनापति होता. आणि स्वातंत्र्यसंगरांतून पेशव्यांनीं माघार घेतली नव्हती.' एक पेशवा राजा आला आणि गेला, तरी स्वातंत्र्यसंगर सुरूच होता. दुसरा पेशवा राजा आला आणि गेला, तरीही तो सुरूच होता. संगरांतून माघार घेणें हें इमानी तात्याचें ब्रीद नव्हतें. तो तसाच रानावनांतून, डोंगरजंगलांतून वणवण करीत गनिमी लढा लढत तरी होता, अथवा लढ्याची सुधारून तयारी तरी करीत होता.

असा वणवण करतां करतां तात्या अतिशय त्रासला. म्हणून परूणच्या जंगलांत लपून बसलेला ग्वाल्हेरचा सरदार मानसिंग ह्याच्या आश्रयाला गेला.

मानसिंग हा इंग्रजांचा फितूर होता. तो स्वतः तर इंग्रजांना शरण गेल्यांतच जमा होता. तात्याला तें काय माहीत ! त्याला वाटलें हा हिंदी माणूस. हा बेइमान कसा होईल ?

लांड्या कोल्ह्याप्रमाणें मानसिंगानें तात्यालाही आग्रहपूर्वक विचारलें, "तुम्ही इंग्रजांना शरण कां जात नाहीं. ते तुम्हांला जीवदान देतील. तुमच्या केसालाही धक्का लावणार नाहींत."

परंतु तात्याला तें रुचलें नाहीं. त्यानें त्या फितुराशीं अधिक कांहींच वादविवाद अथवा विचारविनिमय न करतां एका शब्दांत पुन्हा सांगितलें, "नाहीं."

पण दगलबाज मानसिंग आयती आपल्या पथ्यावर पडणारी ही बहुमोल शिकार हातची थोडीच सोडतो ! त्यानें तात्याला मानभावी गोड गोड साखरघोळ भाषेंत गुंतवून ठेवलें. आणि तिकडे गुपचुप जाऊन इंग्रजांना वर्दी दिली. इंग्रजांना तेंच हवें होतें. तात्या जोंवर जिवंत आहे, तोंवर इंग्रजी राज्याला भारतांत भयंकर धोका आहे, हें इंग्रज ओळखून होते. म्हणून ते त्याला पकडण्यासाठीं जिवाचें रान करून त्रिभुवन पालथें घालीत होते.

बातमी मिळण्याचा अवकाश. ताबडतोब परूणच्या जंगलांत मानसिंगानें सांगितलेल्या मार्गावर इंग्रजी सैन्य धावलें. मानसिंगानें अचानक तात्याला कांहीं कुणकुणही लागूं न देतां पकडून दिलें.

तारीख १८ एप्रिल रोजीं इंग्रजांनीं तात्याचा न्याय केल्याचें नाटक केलें. न्यायालयांत चटावरच्या श्राद्धासारखे बाकीचे सर्व न्यायालयीन सोपस्कार भराभर पार पडल्यावर न्यायाधिशानें तात्याला विचारलें, "तुला कांहीं सांगायचं आहे काय?"

त्यावर तात्या शांत, गंभीर स्वरांत उद्गारला, 'मी इंग्रजांविरुद्ध लढलों, त्याबद्दल मला आतां फांशीं देण्यांत येईल हें मी पूर्ण जाणून आहें. मला कोणतें न्यायालयही नको आणि मला खटल्यांत भागही घ्यायचा नाहीं. माझी एवढीच इच्छा आहे कीं मला गुलामगिरीच्या शृंखलांतून सोडवणूक मिळावी ह्यासाठीं मला तोफेच्या तोंडीं तरी देण्यांत यावं, किंवा फांसावर तरी चढवावं. शेवटीं मला एकच सांगायचं आहे. माझा कुटुंबपरिवार ग्वाल्हेरला असेल. त्या मंडळीचा माझ्या कृत्यांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं. माझ्या वृद्ध वडिलांना माझ्या कृत्यांबद्दल प्रायश्चित्त भोगावं लागूं नये.'

तात्याला न्यायाधीशानें फांशीची शिक्षा सुनावली. त्याच दिवशीं सायं-काळीं चार वाजतां त्याला फांशीं देण्यासाठीं फांशीघराकडे नेण्यांत आलें. फांसापाशीं जातांक्षणीं त्याला पुन्हा एकवार, विचारण्यांत आलें, "तुझी अखेरची कांहीं इच्छा आहे काय?"

तेव्हां त्यानें पुन्हा एकदा तीच विनंती केली, "माझे वडील माझ्या कृत्यांना जबाबदार नाहींत. त्यांचा माझ्यापायीं छळ होऊं नये."

तात्यावरचा आरोप आणि सुनावण्यांत आलेली शिक्षा ह्यांचा त्याला फांसावर चढविण्यापूर्वी पुन्हा एकवार सरकारी शिरस्त्याप्रमाणें उच्चार करण्यांत आला आणि लगेच लोहारानें तात्याच्या पायांतील लोखंडी बेड्या तोडल्या. तात्या लगेच अगदीं शांतपणानें फांशीच्या पायऱ्या चढून

खांबापाशीं गेला. मारेकरी फांशीच्या फलाटावर जाऊन त्याचे हातपाय बांधूं लागले. हेतु हा कीं फांसावर चढतांना आरोपीनें कांहीं खळखळ करूं नये.

तात्या स्मितपूर्वक त्या मारेकऱ्यांना आणि जवळच उभे असलेल्या सरकारी अधिकाऱ्यांना म्हणाला, "हे शिष्टाचार पाळण्याची कांहींच गरज नाहीं."

हें बोलतां बोलतां त्यानें आपल्या हातानें फांसांत आपली मान दिली.

अशी सत्तावनी क्रांतीची अखेरची ज्योत मालवली गेली !

## स्वा ध्या य

१. तात्या टोपेला सभोवार भासणारा अंधार कसा होता ? कां ?

२. राणीच्या जाहीरनाम्यानंतर तात्याला आतां लौकर मरण येईल तर बरें असें कां वाटूं लागलें ? तोंवर कां वाटलें नाहीं ?

३. तात्याच्या स्वामिनिष्ठेची ओळख करून द्या.

४. तात्याला दगा कोणीं व कसा दिला ?

५. तात्यानें फांशीची शिक्षा जाहीर होतांच काय सांगितलें ?

६. फांसावर चढतांना तात्यानें अखेरची विनंती कोणती केली ?





प्रकरण सत्ताविसावें

# १८५७ चा महाराष्ट्र



सन १८५७ च्या क्रांतियज्ञाच्या ज्वाला मुख्यतः उत्तरभारतांत व मध्यभारतांत हिमालयाच्या पायथ्यापासून दिल्लीच्या खालींवरच्या टापूपर्यंतच्या परिसरांत धडाडून उफाळल्या आणि विझल्याही. हें विस्मयकारक वास्तव ऐतिहासिक दृश्य आपण येथवर पाहिलें. परंतु एवढ्यानें ह्या स्वातंत्र्यसंगराच्या करुणकथेची अखेर होत नाहीं.

ह्या क्रांतिसंगराचा पाया अथवा गाभा महाराष्ट्र हाच होता. ब्रह्मावर्तकानपुरांत गंगेच्या कांठीं ह्या स्वातंत्र्यासाठीं अगदीं आरंभापासून उग्र राजकारणी तपश्चर्या करणाऱ्या प्रमुख त्रिमूर्ति नानासाहेब पेशवे, झांशीची राणी लक्ष्मी आणि तात्या टोपे ह्या होत. ह्या तीनही लोकोत्तर विभूति महाराष्ट्रभूमातेच्या कुशींत अवतरलेल्या होत्या.

आणि तसें होणें अगदीं स्वाभाविकही होतें. दिल्लीच्या मोंगल बादशाहीला नमवून मुठींत आणून साऱ्या भारतांत आपला दरारा गाजविणारी, व बलवान इंग्रजांशीं मुकाबला करून त्यांना वठणीवर आणणारी अधिकारी व समर्थ अशी मराठशाही ही एकटीच भारतीय राजसत्ता होती. पेशवाईचा संपूर्णतः अंतर्भाव जिच्यांत होतो, ती मराठशाही हीच भारतांतील अठराव्या शतकाच्या अखेरच्या काळांतील एकटी आणि अखेरची विशाल अशी राज्यसत्ता होय. अर्थात् परवश झालेल्या भारताला परवशतेंतून सोडविण्यासाठीं मराठी बाणा पुढें सरसावा हें अगदीं क्रमप्राप्त होतें. इंग्रजांच्या जुलुमानें चेतून धगधगणारे परंतु प्रतिकूल परिस्थितीच्या राखेखालीं झाकले गेलेले तीव्र असंतोषाचे आणि त्या असंतोषाच्या उदरांतून फाडलेल्या क्रांतीचे निखारे धगधगत्या मराठमोळ्यांतीलच होते. ही कोत्या प्रांताभिमानाची गोष्ट सुतराम् नव्हे. ही खरी वस्तुस्थिति होती.

असें असतां ह्या भारतीय स्वातंत्र्यसंगराचें अखिलभारतीय महाकेंद्र महाराष्ट्र हें कां झालें नाहीं? ह्याचें कारण त्या क्रांतीचीं प्रमुख कार्यक्षम स्फूर्तिस्थानें ब्रह्मावर्त-कानपूर-झांशीच्या परिसरांत होतीं; आणि उत्तरभारत हा टापू ताज्या इंग्रजी जुलुमामुळें अतिशय ज्वालाग्राही व क्रांतिसन्मुख झाला असल्यामुळें सर्वतोपरी क्रांतियज्ञ चेतविण्याला उपयोगी होता.

उत्तर भारताप्रमाणें महाराष्ट्रांतही तेव्हां क्रांतीचा सुसंघटित उठाव होण्याचीं लक्षणें होतीं. परंतु क्रांतीचें नेतृत्व तिकडे दूर उत्तर भारतांत. दळणवळणाचीं साधनेंही तेव्हां अनुकूल नाहींत. शिवाय मुंबईचा गव्हर्नर एल्फिन्स्टन हा चांगलाच अनुभवलेला मुरब्बी इंग्रज. त्यानें उत्तरेंतल्या सारखा क्रांतीचा भडका मुंबई-महाराष्ट्रांत भडकूं नये अशी पूर्ण खबरदारी मुळापासूनच घेतली होती.

तरीदेखील बेळगांव-कोल्हापूरकडील देशी पलटणींनीं तेव्हां उठाव करण्यासाठीं डोकें वर काढलेंच. पण तें वर काढलें न काढलें, इतक्यांत

एल्फिन्स्टननें तें ठेंचून टाकलें. त्या शिपायांचीं हत्यारें लगेच काढून घेतलीं; आणि पुढाऱ्यांना पकडून धडाधड जबर शिक्षा ठोठावल्या. उत्तर भारतांतून क्रांतीच्या खबरी घेऊन येणाऱ्या जासुदांना जागत्या पहाऱ्यानें पकडून ताबडतोब तोफेच्या तोंडीं दिलें.

कोल्हापुरांत ही क्रांतीची आग धुमसूं लागली; त्याबरोबर त्या बंडाळीच्या मुळाशीं असल्याच्या आरोपावरून कोल्हापूरच्या राजाचा भाऊ चिमासाहेब, छत्रपतींचा वकील रंगो बापूजी ह्याचा मुलगा व पुतण्या, जमखिंडीचे बक्षी बंधू ह्यांना पकडून फांशीं देण्यांत आलें. नरगुंदचा राजा भास्करराव बाबासाहेब ह्यालाही ह्या क्रांतीच्या उठावांत भाग घेतल्या-मुळें फांशीं जावें लागलें. हें हत्याकांड महाराष्ट्रांत सन १८५७ च्या उत्तरार्धांत सुरू होतें.

कोणी म्हणेल कीं हा बंडखोरीचा प्रयत्न इंग्रजांमुळें आपल्या वैभवाला मुकलेल्या मातबरांचा होता. तर तसें नाहीं. आम मराठी रयतही क्रांतीच्या पाठीशीं होती. सावंतवाडीचा रामजी शिरसाट हा सामान्य अब्रूदार नागरिक कोल्हापूर-बेळगांव-धारवाडकडे एकदम उठाव व्हावा म्हणून तयारी करीत होता. पण ती योजना सफळ होण्यापूर्वींच त्याचा बींमोड इंग्रजांनीं गोव्याच्या मदतीनें केला.

बेळगांवांतील शिपायांचा पुढारी ठाकूरसिंग, मुनशी, हे सामान्य रयतें-तील क्रांतिकारक नेते उठावाची योजना मूर्त स्वरूपांत येण्याच्या ऐन वेळीं पकडले गेले. मुनशीला तर तोफेच्या तोंडीं देण्यांत आलें.

ह्या साऱ्यांपेक्षां महाराष्ट्राचा रांगडा क्रांतिवीर भागू भिल्ल हाच महाराष्ट्रांतील सत्तावनी क्रांतिवीरांत अग्रपूजेचा मानकरी होय. पुण्याचा दक्षिणभाग आणि नाशिकचा उत्तरभाग ह्या भागांतील रांगड्या काठी-लंगोटी-कांबळें-कुऱ्हाडवाल्या भिल्लांत क्रांतीचें होमकुंड चेतविणारा जिद्दीचा क्रांतिकारक हा भागू भिल्ल. क्रांतिकारक भिल्लांच्या आघाडीच्या टोळीचा नायक. हा अहमदनगरच्या पोलिसदलांतील अंमलदार. पोलिसांच्या कार-

भारांत अडथळा केल्याबद्दल त्याला सक्तमजुरीची शिक्षाही झाली. तुरुंगांतून शिक्षा भोगून भागोजी जो सुटला, तो नांदूर-शिंगोरी ह्या आपल्या मायभूमींत बायकामुलांना भेटायलाही गेला नाहीं. प्रथम क्रांतीचें दळ भिल्लांतून जमविण्याच्या उद्योगाला लागला. भागोजीचें क्रांतिदळ भराभर वाढूं लागलें. त्याची सरकारला चांगलीच दहशत उत्पन्न झाली.

अखेर सरकारनें संगमनेर आणि सिन्नर येथील मामलेदारांना लिहिलें, " कसेंही करा पण भागू नाइकाला वश करून मुठींत आणा. "

भागूच्या कार्यक्षेत्रांतील ते मामलेदार चांगले माहितगार. पण त्यांनाही भागू भाळला नाहीं. अखेर सरकारला भागू नाइकाच्या वाढत्या उठावाचा बंदोबस्त करण्यासाठीं लष्कर रवाना करावें लागलें.

परंतु त्या लष्करालाही भागूचा बंदोबस्त बराच महाग पडला. भागूशीं जंगलांत लढत देतांना लेफ्टनंट हेन्री जखमी झाला. कैक शिपाई जायबंदी झाले. तेव्हां कुठें भागूच्या टोळीची पिछेहाट झाली.

पण तेवढ्यानेंही बहाद्दर भिल्ल दबले नाहींत. भागूचा जणूं उजवा हात असा विश्वासू अनुयायी पाथरजी नाईक क्रांतिकारक भिल्लांचा पुढारी झाला. त्याच्याशीं सामना देऊन त्याला पिटाळून लावतां लावतां लेफ्टेनंट जनरल मॉंटगॉमेरीला पुरेवाट झाली.

तरीही भिल्ल दबले नाहींत. अधिकच चेवून उठले. जावजी नाईक बोमला, राघोजी भांगरा, हरजी नाईक, भागूचा मुलगा यशवंत नाईक असे एकाहून एक आणि हिकमती भिल्ल लढवय्ये भागूचा क्रांतीचा वसा तसाच जोमानें पुढें चालवीत होते. कांहीं मेले. कांहीं लपले. पण शरण कोणीही जाईनात. सर्वांचें स्फूर्तिस्थान भूमिगत भागू नाईक असा पाठीराखा पाठीशीं होताच.

भिल्लांचा उठाव अनावर होऊं लागला, तसें सरकार चेवलें. ह्या बंडखोरांचा एकदा काय वाटेल तें करून समूळ नायनाट करायचाच अशा निर्धारानें सरकारी लष्करानें भागूचा सिन्नरजवळील मीठसागर गांव

हा बालेकिल्ला हेरून त्यावर जोरदार चढाई केली. तेव्हां मात्र भागू नाईक गुहेंतून वाघ खवळून उठावा तसा लढायला धावून आला. दिवसभर खडाजंगीची हाणामारीची लढाई झाली. अखेर सरकारला भिल्लांवर जय मिळाला. पण त्यासाठीं बरेच शिपाई बळी द्यावे लागले, आणि भयंकर दगदग सोसावी लागली. त्या मीठसागरच्या लढ्यांत क्रांतिवीर भागू भिल्ल ठार झाला.

अशी तेव्हांच्या महाराष्ट्रांतील रांगडी जनताही आपल्या पुढाऱ्यांच्या बरोबरीनें सत्तावनी बलिदानांत हिरीरीनें पुढें सरून भाग घेण्याइतकी महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं जागत होती. ह्याचा विसर कुणाला कसा पडेल ?

### स्वा ध्या य

१. महाराष्ट्र हा सत्तावनी क्रांतीचा पाया अथवा गाभा कसा ?

२. ह्या क्रांतीच्या प्रवर्तनाचा मान महाराष्ट्राला मिळण्याला स्वाभाविक कारणें कोणतीं होतीं ?

३. भारतीय स्वातंत्र्यसंगराचें अखिलभारतीय महाकेंद्र महाराष्ट्र हें कां झालें नाहीं ?

४. महाराष्ट्रांत सत्तावनी क्रांतीला साथ कोठें कोठें व कशी मिळाली ? ती कोणीं कशी दडपून टाकली ?

५. बेळगांवकडे संकल्पित उठाव कां होऊं शकला नाहीं ?

६. महाराष्ट्रांतील सत्तावनी क्रांतीचा अग्रपूजेचा मानकरी कोण ? कसा ?

७. क्रांतिवीर भागू नाईकाला कोंडण्यासाठीं सरकारनें काय काय प्रयत्न केले ? त्यांना भागूनें कसें तोंड दिलें ?

८. भागू भिल्लामागोमाग आणखी कोण कोण रांगडे सत्तावनी क्रांतिवीर उफाळून आले ? त्यांनीं भागूचा वसा कसा चालविला ?

९. मीठसागराच्या लढाईची माहिती द्या.





प्रकरण अठ्ठाविसावें

# चला, इथून पुढें चला....



सन अठराशें सत्तावनांत आपला भारत स्वातंत्र्ययुद्ध लढला. अगदीं प्राणपणानें लढला. पण त्या युद्धांत अखेर बलवान् इंग्रजी साम्राज्यशाही शत्रूपुढें आपला निभाव लागला नाहीं. इंग्रजी गुलामगिरी आपणाला झुगारून देतां आली नाहीं.

परंतु त्याच बलवान् इंग्रजी साम्राज्यशाहीशीं भारत स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं पुन्हा लढला. आपणाला ह्या युद्धांत चांगलें पावशतकपर्यंत लढावें लागलें. पावशतकच कां ? भारतीय राष्ट्रसभा ( कॉंग्रेस ) स्थापन झाली तेव्हांपासून ( सन १८८५ सालापासून ) इंग्रजांशीं हा भारतीय स्वातंत्र्याचा लढा आपण भारतीय जनता कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं सुमारें बासष्ट वर्षें एकसारखा लढत होतों. काळ बदलत होता. लढाईचे पवित्रे बदलत होते. डावपेच बदलत

होते. तथापि कधीं लढाई तर कधीं छावणी तर कधीं तात्पुरती माघार असें युद्धतंत्र आवश्यकतेप्रमाणें सांभाळून लढा सतत लढला जात होता.

पहिलें जागतिक महायुद्ध सन १९१८-१९ सालीं आवरलें गेलें आणि आपल्या भारताच्या स्वातंत्र्ययुद्धांत गांधीयुगाचें अगदीं नवें पर्व सुरू झालें. युद्ध तेंच. योद्धे तेच. शत्रु तोच. फक्त पवित्रा बदलला व शस्त्रास्त्रें बदललीं. हें स्वातंत्र्ययुद्ध भारत स्वतंत्र झाला, विजयी झाला, तेव्हां खरोखर आवरलें. तारीख पंधरा ऑगस्ट सन एकोणीसशें सत्तेचाळीस रोजीं.

आतां आपण जातां जातां पाहूं. सत्तावनी स्वातंत्र्ययुद्धांत आपण हिंदु-मुसलमान सारे भाई भाई एकजुटीनें लढूनही हरलों. आणि ह्या दुसऱ्या स्वातंत्र्यायुद्धांत तेच आपण विजयी झालों आपला प्रतिस्पर्धी तोच, इंग्रजी साम्राज्यशाही. हिंदी राजेरजवाड्यांनीं सत्तावनी स्वातंत्र्य-युद्धांत आपणाला स्वातंत्र्यप्राप्तीच्या कामीं हातभार लावला नाहीं. इंग्रज-धार्जिणेपणा दाखविला. त्याहूनही किळसवाणा मतलबी अलगपणा आणि इंग्रजधार्जिणेपणा ह्या स्वातंत्र्ययुद्धांत दाखविला. सत्तावनी स्वातंत्र्ययुद्धांत आपले हिंदी शिपाई शस्त्रास्त्रें घेऊन स्वातंत्र्यासाठीं आघाडीला प्राणपणानें लढले. ह्या स्वातंत्र्ययुद्धांत तें सरकारी लष्कर आपल्या म्हणजे जनतेच्या पाठीशीं उभें नव्हतें. तें इंग्रज सरकारच्या चाकरींतलें लष्कर, सरकारच्या पाठीशीं उभें होतें. सरकारच्या बाजूनें तें लष्कर, तें पोलीसदल आमचीं डोकीं फोडायला आणि आमच्यावर गोळ्या झाडायला नेहमीं सरकारी हुकुमानुसार आमच्या विरुद्ध उभें असे. प्रतिस्पर्धी सरकार सर्व शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज होतें, तर आपण निःशस्त्र होतों. सत्तावनी स्वातंत्र्ययुद्धांत आपले मुसलमान बांधव आपल्याप्रमाणेंच यथाशक्ति यथामति आपल्या खांद्याला खांदा भिडवून स्वातंत्र्ययज्ञांत स्वतःचें बलिदान करायला उभे होते. पण ह्या वेळीं ते सरकारच्या आणि त्यांच्या पुढाऱ्यांच्या कारवायामुळें लढ्यापासून बहुधा वेगळे असे फटकून वागत होते. तथापि एकंदरींत भारताची आम जनता एकजुटीनें हा स्वतःच्या स्वातंत्र्याचा लढा स्वतः लढत होती.

शीख लष्करी शिपायांची गोष्ट आपण सोडून देऊं. लष्करांतले शिपाई शीख काय, हिंदु काय, मुसलमान काय, सारे बिचारे पोटासाठीं सरकारी नोकरीच्या बंधनांनीं बांधले गेलेले. ते आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं लढायला आले नाहींत असें आपणाला म्हणतां येणार नाहीं. त्यांना संधि मिळाली तेव्हां दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या ऐन रण-धुमाळीच्या काळांत सेनापति सुभाषचंद्र बोस ह्यांच्या आझाद हिंद सेनेंत भरती होऊन ते भारताच्या उद्धाराकरितां प्राणपणानें लढायला उभे राहिलेच कीं नाहीं ? त्यांत हिंदु होते, मुसलमान होते, शीख होते, सारे होते. आणि ही लष्कराची गोष्ट सोडली, तर भारताची आम शीख जनता आपल्या कॉंग्रेसच्या स्वातंत्र्यलढ्याच्या पाठीशीं आपणां साऱ्या भारतीय जनतेच्या हातांत हात घालून उभी होती. बहुतेक सारे मुसलमान बंधु आपल्या लढ्यापासून रुसून दूर बसले, तरी लढा कांहीं त्यामुळें खोळंबला नाहीं. म्हातारीनें कोंबडा झाकला, म्हणून उजाडायचें राहिलें नाहीं. लढा आम भारतीय जनतेनें जिंकला. आपण विजयी झालों. स्वतंत्र झालों. आपल्या मायदेशाचे आपण धनी झालों. आपल्यांतूनच आपलें सरकार आपण उभें केलें. तें स्वतंत्र भारताचा राज्यकारभार पाहूं लागलें.

परंतु खरें पाहिलें तर निदान वरवर पाहातां तरी आपणालादेखील शेकडों देशी संस्थानें ,डलहौसीप्रमाणेंच ह्या ना त्या उपायानें ‘ खालसा ’ करावीं लागलीं. नाहीं का ? डलहौसीपेक्षांही झपाट्यानें तीं ‘ मुक्त ’ करावीं लागलीं. भारतांत समाविष्ट करावीं लागलीं. डलहौसीनें थोडींच संस्थानें खालसा केलीं असतील. पण आपणाला सारींच ह्या ना त्या रूपानें खालसा करावीं लागलीं. जमीनदार-वतनदारांची इंग्रजांनीं वासलात लावली नव्हती. पण आपलें सरकार आजकाल ती लावीत आहे. जमीनदारांना रसातळाला न्यावें म्हणून नव्हे, तर तत्त्वत: ‘ सब भूमि गोपाल ‘की ’ ह्या न्यायानें शेतकरी भारतांत सर्वांना कष्ट करून अन्नवस्त्र मिळवून सुखानें जगतां यावें म्हणून. लोकांच्या धार्मिक बाबतींत आपण सत्ता किंवा ढवळाढवळ

करणार नाहीं, असें इंग्रजांचें धोरण होतें. आपण आपल्या लोकसरकारचें धोरणही तसेंच उदारपणाचें ठेवलें आहे. सरकारी नोकऱ्या लोकांना देण्याच्या बाबतींत मात्र राणीच्या जाहीरनाम्यांतील आश्वासन तें केवळ कागदी असलें तरीही आपण आजच्या घटकेला पाळूं शकत नाहीं. कारण तसें करणें आजच्या काळीं इष्ट नाहीं.

इंग्रजी राजवट आणि आजचें आपलें स्वतंत्र भारतांतील लोकराज्य हीं दोन स्वातंत्र्ययुद्धांचीं दोन फळें आपण जवळ जवळ नजरेपुढें आणलीं तीं कशासाठीं ? त्यांतला फरक समजून घेऊन बऱ्यावाइटाची पारख करतां येण्यासाठीं आणि आपल्या स्वातंत्र्याचा खरा अर्थ ध्यानीं आणण्यासाठीं. नाहींतर अपुऱ्या माहितीमुळें कोणाला वाटेल कीं ह्या भारताच्या लोकसरकारनें डलहौसीच्या ‘खालसा’ वरवंटेशाहीवर ताण केली. इंग्रजांनीं हिंदी संस्थानिकांशीं कांहीं करारमदार केले होते आणि ते विश्वासानें पाळण्याचें राणीच्या जाहीरनाम्यांत कबूलही केलें होतें. ते सारे करारमदार स्वतंत्र भारताच्या लोकसरकारनें कागदाचीं चिटोरीं ठरवून कचऱ्याच्या टोपलींत फेकून दिले. सारे संस्थानी अंमल धुळीला मिळविले. मग कां चिडूं नये ह्या संस्थानिकांनीं ह्या भारताच्या लोकसरकारवर ?

तसेंच हिंदी लोकांचा जमीनजुमला वंशपरंपरेनें ज्यांचा त्यांच्याकडे ठेवण्याचें इंग्रजांनीं राणीच्या जाहीरनाम्यांत कबूल केलें होतें. आणि हें स्वतंत्र भारताचें लोकसरकार तर ‘कसेल त्याची जमीन’ म्हणत भराभर जमीनदारी वितळवीत चाललें आहे. कां चिडूं नये ह्या जमीनदारांनीं ह्या भारताच्या लोकसरकारवर ?

तसेंच नोकऱ्यांच्या बाबतींत कोणताही जातिभेद, धर्मभेद अथवा वर्ण-भेद विचारांत न घेतां सर्वांना त्यांच्या पात्रतेप्रमाणें अधिकाराच्या जागा दिल्या जातील, असें इंग्रजांचें धोरण होतें. पुढें पुढें तें धोरण ‘राखीव जागा’ आणि ‘खुल्या जागा’ असें थोडें थोडें निरुपायानें बदलत गेलें हें निराळें. पण आजचें स्वतंत्र भारताचें लोकसरकार तर मागासलेल्या बहुसंख्य

जमातींना पुढें येतां यावें म्हणून राखीव जागांच्या धोरणाचा सर्रास अवलंब करीत आहे. देशांतील स्वभावतःच पुढारलेल्या बुद्धिमान आणि लायक लोकांची ह्या सरकारी धोरणामुळें मोठीच कुचंबणा होत आहे. ह्या कुचंबणाऱ्या लोकांनीं कां चिडूं नये ह्या भारताच्या लोकसरकारवर ?

भारतांतील पहिल्या स्वातंत्र्ययुद्धाच्या अखेरीला भारतावर राज्य करणारें इंग्रजी सरकार, आणि ह्या दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धाच्या यशस्वी अखेरीला स्वतंत्र भारतावर राज्य करणारें आपलें भारताचें लोकसरकार ह्या दोन युद्धांतील आणि राजवटींतील फरक आपण सुजाणपणानें ध्यानीं घ्यायला हवा.

पहिली गोष्ट, पहिल्या स्वातंत्र्ययुद्धानंतर भारतावर राज्य करणारें सरकार हें परकें सरकार होतें. आपली इंग्रजी राजवट काय केल्यानें भारतांत मजबूतपणें दीर्घकाल टिकून राहील, ह्या धोरणानें त्या सरकारचा राज्य-कारभार चाले. सत्तावनी क्रांतियुद्धांत हिंदी संस्थानिक जे खालसा झाले, त्यांखेरीज बहुतेक सारे मायदेशाविरुद्ध परक्या जुलमी इंग्रज सरकारलाच कोणी उघड तर कोणी आडपडद्यानें सामील होते. म्हणून तर त्या आधारावर तेव्हां इंग्रजी राजवट भारतांत टिकली. आणि म्हणूनच ह्या देशव्यापी फितुरीबद्दल बक्षीस म्हणून इंग्रज सरकारनें राणीच्या जाहीर-नाम्याच्या द्वारा त्या संस्थानिकांना अभय दिलें होतें. हे संस्थानिक राजे-रजवाडे जसे पहिल्या स्वातंत्र्ययुद्धांत आपणाला नडले, तसेच दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धांतही फार नडले. ते त्यांच्या त्यांच्या अधिकारांतील जनतेलाही नकोसे झाले होते. ते हवेसे होते फक्त इंग्रजसरकारला, फोडा आणि झोडा ह्या भेदनीतीनें अगदीं अखेरपावेतों देशांत बखेडे माजवून आपला मतलब साधण्यासाठीं म्हणून. स्वतंत्र भारतांत ते टिकले नाहींत. जी गत संस्थानिकांची झाली, तीच थोड्याफार फरकानें जमीनदारांचीही झाली.

तशाच सरकारी नोकऱ्या. मागासलेल्या दलितवर्गाला मागासलेपणांत ठेवून आपल्या भारताचें पाऊल आजच्या जगांत प्रगतीच्या मार्गानें पुढें

पडलें नसतें. रामराज्याचा आदर्श आपण डोळ्यांपुढें ठेवतों. रामानें वानर-भिल्लादि तेव्हां मागासलेल्या दलितांना माणुसकीनें जगण्याचा प्रगतीचा मार्ग दाखवून दिला, म्हणून लंकेवरील स्वारींत ती सारी दलित जनता रामाच्या झेंड्याखालीं उभी राहून रावणाच्या प्रबळ सेनेशीं लढली आणि राम विजयी झाला. त्या थोर रामाच्या पावलावर पाऊल टाकूनच आपणाला भारताचें राज्य हें रामराज्य शोभवायचें आहे.

गतकाळाचा पडताळा पाहून, इतिहासाचा बोध घेऊन, काळाचीं आणि परिस्थितीचीं पावलें ओळखून आपणाला पुढारल्या वाटेनें जायचें असतें तें असें.

### स्वाध्याय

१. सत्तावनी स्वातंत्र्ययुद्धानंतर पुन्हा भारताला केव्हांपासून केव्हांपर्यंत स्वातंत्र्ययुद्ध लढावें लागलें ? तें कुणाच्या झेंड्याखालीं कसें लढावें लागलें ?

२. ह्या दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धाचें स्वरूप कसें होतें ?

३. हिंदी राजेरजवाडे ह्या दोन्ही स्वातंत्र्ययुद्धांत कसे वागले ?

४. हिंदी लष्कर ह्या दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धांत लोकांच्या बाजूनें कां लढूं शकलें नाहीं ?

५. मुसलमानांनीं ह्या दोन्ही स्वातंत्र्ययुद्धांत कशी कशी साथ दिली ?

६. शिखांचा ह्या दोन्ही स्वातंत्र्ययुद्धांत वांटा कोणता ?

७. इंग्रजांनीं देशी संस्थानें खालसा करणें, आणि स्वतंत्र भारताच्या लोकसरकारनें ती खालसा करणें ह्यांत फरक कोणता ?

८. हिंदी लोकांना नोकऱ्या देण्याच्या बाबतींत आजच्या भारताच्या लोकसरकारच्या धोरणाचा अर्थ कोणता ?